# जगाचे प्रवासी

भाग २ रा

लेखक

प्रो. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.

श्री लेखन वाचन भांडार,
लक्ष्मी रोड, पुणें २.

आवृत्ति पहिली १९५१

किंमत सव्वा रुपाया

# प्रास्ताविक

'जगाचे प्रवासी' या मालेतील हें दुसरें पुस्तक आहे. यांत ह्युएन्त्सँग, डॉ. लिव्हिंग्स्टन् व आमुंडसेन आणि स्कॉट् यांच्या प्रवासाचीं वर्णनें आलीं आहेत. ज्ञानसंपादनासाठीं ह्युएनत्सँग या चिनी प्रवाशानें केलेल्या भ्रमंतीची हकीकत वाचून प्रत्येक वाचकाला खरोखर विस्मय वाटेल. सामान्य समज असा आहे कीं, हा एक हौशी प्रवासी होता. हा समज खरा नाहीं. धर्मज्ञानाचें यथार्थ संपादन करावें हा त्याचा हेतु होता व ह्यासाठीं त्यानें दीर्घ प्रवासाचें साहस केलें. प्रवासाचीं साधनें म्हणजे घोडीं किंवा उंट येवढींच असत आणि लोकवस्ती अगदीं पातळ, कोठें तुरळक असे व कांहीं ठिकाणीं तर बिलकुलच नसे. चोराचिलटांचा उपद्रव फार असे आणि अन्नपाणी वेळेवर मिळणें सुद्धां पुष्कळदां अवघड बने. अशा अडचणींनीं दबकून न जातां या प्रवाशानें केलेली भारताची यात्रा पाहिली म्हणजे त्याची धर्मज्ञानाची आस्था किती जाज्वल्य होती हें ध्यानांत येतें. हा प्रवासी महापंडित होता; उत्तम संस्कृतज्ञ होता व स्वतः ग्रंथकर्ता होता. पण शेवटपर्यंत त्यानें विद्यार्थ्याची भूमिका सोडली नाहीं. अशा या थोर पुरुषाची योग्यता आपल्या देशांतील लोकांनीं व राजेरजवाड्यांनीं फार चांगली ओळखिली, हें पाहून आनंद वाटतो.

डॉ. लिव्हिंग्स्टन् या इंग्रज संशोधकानें मध्य आफ्रिकेचे दरवाजे पूर्णपणें उघडून दाखविले. तोंपर्यंत हा प्रदेश म्हणजे एक गूढच होतें. लिव्हिंग्स्टन्नें सोसलेल्या संकटांना गणतीच नव्हती. पण परमेश्वराची ही सृष्टि बघत बघत चारी दिशा हिंडावें हा त्याच्या मनाचा हव्यास होता आणि त्यासाठीच तो मरण पावला. इंग्लंड देशाच्या कीर्तिमंदिरांत डॉ. लिव्हिंग्स्टन् या भूसंशोधकाचें नांव नेहमींच गाजत राहिलें आहे.

## प्रास्ताविक

आमुंडसेन हा नॉर्वे देशांतील संशोधक होता व स्कॉट हा इंग्लंडांतील होता. दोघेही अतिशय साहसी व प्रखर जिज्ञासू होते. दक्षिण ध्रुव शोधून काढण्याच्या कामीं त्यांनीं मानवी प्रयत्नांची पराकाष्ठा केली. स्कॉटला पराकाष्ठा करूनही यश मिळालें नाहीं. आमुंडसेन याला तें मिळालें. यशापयशाचा ताजवा फार नाजूक ठरला. पुढें दिलेल्या हकीकती वाचल्या म्हणजे दिसून येईल कीं या दोघांत सरसनिरस कोण हें ठरविण्याची बुद्धि धरणें खोटें काम आहे. स्कॉटनें आमुंडसेनइतकेच श्रम केले होते व हाल तर जास्त सोसले होते. पण यश त्याच्यापुढें पाठमोरेंच उभें राहिलें व आमुंडसेनला सन्मुख झालें. उत्तर ध्रुव–शोधाच्या कामीं आमुंडसेनची निराशा झाली होती; कारण तो तेथें पोचावयाच्या आधींच पेरीनें तो शोध लावून टाकला होता. दक्षिण ध्रुव–शोधाच्या बाबतींत स्कॉटच्या वाट्याला ती निराशा आली; कारण थोडे दिवस आधीं आमुंडसेन यानें आपली ध्वजा तेथें रोविली होती. पण यश कोणालाही मिळालें असलें तरी या दोघांचीही, कीर्ति संशोधनाच्या इतिहासांत अजरामर झालेली आहे. कॅ. कुकनें दक्षिण महासागरांत थोडासा प्रवास केला होता. पण तो सांगत आला होता कीं, तिकडील समुद्रांत एकादें विशाल भूपृष्ठ आहे ही कल्पना चुकीची आहे. रॉस यानें कुकचें म्हणणें चुकीचें ठरविलें. तेव्हांपासून ज्यांनीं ज्यांनीं या कामीं भ्रमन्ती केली त्यांचा इतिहास पुढें दिला आहे.

श्री. म. माटे.

# अनुक्रमणिका







# ह्युएनत्सँग

ज्या जगप्रसिद्ध प्रवाशाची हकीकत पुढें दिली आहे, त्याचें पाळण्यांतलें नांव ह्युएनत्सँग असें होतें. लहानपणीं त्याला घरांत चिन् असें म्हणत असत. ताइ-कुइचा प्राचीन नगरशेट चांग कॉंग् याच्या वंशांत ह्युएनत्सँग जन्माला आलेला होता. त्याचा पणजाही असाच एका शहराचा मुख्याधिकारी होता. त्याचा आजा कॉंग् हा मोठा विद्वान् माणूस असून, त्याला सरकारांत मानाची नोकरी मिळालेली होती. राजविद्यामंदिराचा प्रमुख म्हणूनही त्याची नेमणूक झाली होती; आणि या कामाबद्दल चाऊ नान् या गांवाचें उत्पन्न त्याला बहाल केलें होतें. अर्थातच हें ह्युएनत्सँगचें घराणें श्रीमंतांत मोडूं लागलें. ह्युएनत्सँगचा बाप हुई असाच मोठा विद्वान् माणूस होता. त्याची चालरीत आणि त्याच्या वागणुकींतील आदब पाहून त्याच्याविषयीं लोकांच्या मनांत आदर उत्पन्न होई. रूपसंपदा आणि बुद्धिमत्ता हीं दोन्हीं लेणीं त्याला देवानें दिलीं होतीं. हा कोवळा, सुंदरसा मुलगा बालवयांतच धर्मपुस्तकांतील ऋचा खडाखड म्हणूं लागला. त्याची विद्या, त्याचें रूप आणि त्याला अनुसरून त्यानें अंगावर घेतलेली वस्त्राभरणें हीं पाहून लोकांना फार कौतुक वाटे. हळूहळू मोठा झाल्यावर त्याला कळून चुकलें कीं, सुई राजवंश लवकरच ऱ्हास पावणार आहे;

आणि म्हणून आपण राजकारणांत मन घालण्यांत मतलब नाहीं. तो अभ्यासांतच गर्क होऊन गेला. राजानें त्याला मोठमोठ्या नोकऱ्या देऊं केल्या. परंतु तो दरवेळीं म्हणे कीं, " मी फार अशक्त आहें. माझी प्रकृति चांगली नसते; आणि म्हणून हीं कामें माझ्या हातून व्हावयाचीं नाहींत." अशा रीतीनें राजसेवा न पत्करतां, तो अभ्यासांतच गढून राहिला आणि परंपरेनें चालत आलेलें घरांतील पांडित्य त्यानें वाढीस लावलें.

या हुईला चार मुलगे झाले. ह्युएनत्सँग हा त्याचा चौथा मुलगा. लहानपणापासूनच ह्युएनत्सँग मोठा गंभीर दिसे; आणि त्याच्या बुद्धीचें तेज पाहून तर लोक चकित होत. तो आठ वर्षांचा असतांना एक मोठा चमत्कार घडला. बाप एक पुराण मोठ्यानें वाचीत होता. पुराणांत अशी कथा आली कीं, सांग सू हा आपल्या बापापुढें मोठ्या आदरानें उभा राहिला आहे. ते शब्द कानीं पडतांच हा छोटा ह्युएनत्सँगसुद्धां तट्कन् उभा राहिला. बापानें विचारलें कीं, " तूं कां उभा राहिलास ? " ह्युएनत्सँग म्हणाला, " सांग सू हा जर आपल्या बापापुढें आदरानें उभा राहिला होता, तर मी तुमच्यापुढें कसें बरें बसून रहावें ? " हें त्याचें उत्तर ऐकून बापाला मोठें नवल वाटलें; आणि हा पोरगा पुढें कोणीतरी मोठा माणूस होणार आहे असें तो आपल्या घरांतील माणसांना सांगूं लागला.

येवढ्या लहान वयांतच ह्युएनत्सँग धार्मिक पुस्तकें वाचूं लागला. त्यांतील प्राचीन ऋषींचीं वचनें वाचून त्याला मोठी मौज वाटे. मात्र, ज्या ग्रंथांत भाषेचें सौंदर्य नसेल आणि प्रतिपादनांत यथार्थता नसेल, तें पुस्तक त्याला बिलकूल आवडत नसे. तसेंच ज्ञानशील आणि पवित्र अशा ऋषींच्या वचनांच्या विरुद्ध ज्या लोकांचा आचार असेल, त्यांच्याशीं तो फटकूनच वागत असे. बरोबरीचीं पोरें बाजारहाटांत कोठेंतरी भटकत असत.

ह्युएनत्सँगला मात्र त्यांची संगति कधींच मानवली नाहीं. रस्त्यांतून एखादी मिरवणूक निघाली म्हणजे झांजा वाजत, नगारे वाजत, माणसें मोठमोठ्यानें गात चाललेलीं असत, आणि लहान मुलें–मुलीसुद्धां याच गर्दींत ओरडत चाललेलीं असत. पण ह्युएनत्सँग यांच्या मेळ्यांत कधींसुद्धां गेला नाहीं. शुद्ध विचारसरणी आणि संयमशील आचार यांच्या चिंतनांतच याही वयांत तो आपला वेळ घालवी.

त्याचा भाऊ चांग सी यानें यापूर्वींच बुद्धाचा धर्म स्वीकारला होता; आणि लोयांग या पूर्व प्रदेशाच्या राजधानींतील सिंगतु नावाच्या मठांत तो जाऊन राहिलेला होता. त्याच्या कानीं गेलें कीं, आपला धाकटा भाऊ धर्मतत्त्वांचा अभ्यास करण्यांत इतक्या लहानपणींच मग्न झाला आहे. तो तावडतोब घरीं आला आणि त्याला आपल्या मठांत घेऊन गेला. बुद्धाच्या तत्त्वज्ञानाचे ग्रंथ कसे वाचावे, आणि त्यानें घालून दिलेले आचार कसे पाळावे, याचें शिक्षण चँग सीनें आपल्या लहानग्या भावाला तेथें दिलें.

पुढें एकदां असें झालें कीं, राजाचें आज्ञापत्र निघालें आणि लोयांग शहरीं चौदा धर्मगुरूंची निवड व्हावयाची आहे, असें घोषित झालें. या धर्मगुरूंना सरकारांतून वेतन मिळणार होतें. स्वाभाविकपणेंच निवडणूकीसाठीं शेंकडों अर्ज आले. ह्युएनत्सँग हा वयानें फारच लहान असल्यामुळें त्याला अर्ज करतां येईना. पण ज्या मठांत ही निवडणूक व्हावयाची होती, तेथें येऊन तो दाराशीं उभा राहिला. नगराचा मुख्याधिकारी चिंग शेन को याची दृष्टि त्याच्यावर गेली आणि त्यानें त्याला विचारलें, " तूं रे येथें कशासाठीं आला आहेस ? तूं निवडणूकीला उभा आहेस काय ? " ह्युएनत्सँग म्हणाला " मी वयानें लहान, म्हणून माझा अर्ज कोणी घेत नाहीं." अधिकारी म्हणाला, " पण तूं निवडून येऊन करणार तरी काय ? " ह्युएनत्सँगनें एकाद्या प्रौढ माणसासारखें उत्तर केलें, " वैरागी होऊन

बसण्यांत माझा हेतू एवढाच आहे कीं, आपल्याला ठाऊक झालेला तथागताचा धर्म चोहोंकडे पसरवावा.'' हें त्याचें उत्तर ऐकून मुख्याधिकारी चकितच झाला. आणि मग, आपल्या दुय्यमांकडे वळून तो म्हणाला, " धर्मग्रंथांची पोपटपंची अनेकांना साधते; पण या पोराचा आत्मविश्वास कांहीं निराळाच आहे. तुम्हीं जर याला निवडाल तर शाक्यमुनीचा हा एक फार थोर शिष्य होईल, असा मला विश्वास वाटतो. मला एवढेंच वाईट वाटतें कीं, तुम्हीं व मी आतां वयस्कर झालों आहों; आणि जेव्हां या मुलाच्या प्रौढ वाणींतून बुद्धाच्या तत्वज्ञानाचा सुशीतल वर्षाव या भूमीवर होईल, तेव्हां त्यांत उभें रहावयास तुम्हीं व मी इहलोकीं नसूं. पण तें कसेंही असो, मला हें स्वच्छ दिसतें कीं, या मुलाच्या बुद्धीचें झळकणारें तेज सांदींत पडतां उपयोगाचें नाहीं.'' मुख्याधिकाऱ्याच्या इच्छेप्रमाणें ह्युएनत्सँगची निवड झाली आणि तो आपल्या भावाच्या संगतींत मठांत राहूं लागला.

या मठांत किंग नांवाचा एक पंडित रहात असे. त्याला निर्वाणसूत्र पाठ येत असे; आणि त्यावर तो प्रवचनेंही करी. ह्युएनत्सँग यानें निर्वाण-सूत्राची पोथी त्याच्याकडून मागून घेतली; आणि तो त्या पुस्तकाच्या असा मागें लागला कीं, त्याला जेवण सुचेना कीं झोंप येईना! येन् नांवाचा दुसरा एक पंडित तेथें होता. त्याच्याकडून महायान शास्त्राची संथा त्यानें घेतली. अभ्यासांत त्याची प्रगति भराभर होऊं लागली. पुस्तकांतील मजकुराचें श्रवण जरी एकदांच झालें, तरी त्याचा अर्थ त्याला उत्तम समजत असे, आणि त्या मजकुराची दुसरी आवृत्ति झाली म्हणजे तर तो ती पोथी पाठच म्हणूं लागे! मठांतील सर्व भिक्षु चकित होऊन गेले. शेवटीं ते त्याला एकदां म्हणाले, " आज संध्याकाळचें प्रवचन तुम्हींच करावें.'' तो व्यासपीठावर बसला आणि धर्माची गूढतत्त्वें आपल्या प्रसादयुक्त

वाणीनें आणि काटेकोरपणानें त्यानें अशीं विशद करून सांगितलीं कीं, मठांतले सारे लोक संतुष्ट होऊन गेले. या वेळीं ह्युएनत्सँग केवळ तेरा वर्षांचा होता.

याच सुमारास, सुई राजवंश बुडाला आणि राज्यांत जिकडे तिकडे गोंधळ माजला. राजधानींत चोरांचा सुळसुळाट झाला आणि हो व लो यांच्या दुआबांतील प्रदेशांत हिंस्र पशु हिंडू लागले. अर्थातच, भिक्षूंनीं पलायन केलें. जे पळाले नाहींत ते मरून गेले. ह्युएनत्सँग आपल्या भावाला म्हणाला, " आतां येथें राहण्यांत मतलब नाहीं. आपण तांग देशांत जाऊन राहूं. " इ. स. ६१८ सालीं त्यांनीं आपला देश सोडला. पुढें यांग ती या सम्राटानें आपल्या कारकीर्दीच्या पहिल्याच वर्षी चार धर्ममंदिरें प्रस्थापित केलीं; आणि साम्राज्यांतील महापंडितांनीं तेथें येऊन रहावें, अशी इच्छा त्यानें प्रकट केली. अनेक पंडित तेथें येऊन राहिले. त्यांत किंग तु आणि साइत्सिंग हे प्रमुख होते. परंतु पुढें याही देशांत मोठा दुष्काळ पडला; आणि ह्युएनत्सँग आणि त्याचा भाऊ शूह परगण्याकडे निघाले. वाटेनें, कॉंग आणि किंग् हे त्यांच्या मठांतील दोघे पंडित त्यांना भेटले. आपल्या या जुन्या गुरूंना पाहून दोघां भावांना आनंदाचें भरतें आलें. मग ते सर्वजण शिंगतु येथें गेले; आणि तेथें त्यांनीं एक धर्मसभा प्रस्थापित केली. तेथें त्यांनीं साशत्सिंग याच्या मुखांतून महायान संपरिग्रहसूत्र आणि अभिधर्मसूत्र हे ग्रंथ ऐकले; आणि चिन् याच्या मुखांतून कात्यायन सूत्र ऐकलें. अशा रीतीनें ह्युएनत्सँग याचा निरनिराळ्या दर्शनांचा अभ्यास पुरा होत आला. भोंवतालच्या दुष्काळी मुलखांतून अनेक पंडित शूह मुलखांत लोटले. पण ह्युएनत्सँग याची बरोबरी करणारा एकही पंडित त्यांत नव्हता ! ह्युएनत्सँगचा मोठा भाऊसुद्धां त्याच्या सारखाच बुद्धिमान् होता. त्याची चर्या एकाद्या सौम्य साधुपुरुषासारखी दिसे. आणि

तो कोठेंही गेला म्हणजे त्याचें तें प्रगल्भ रूप पाहून लोक त्याच्याकडे आदरयुक्त मनानें पाहूं लागत. निर्वाणसूत्र आणि अभिधर्मशास्त्र यांचा अभ्यास त्यानें उत्तम केलेला होता. धाकटा भाऊही या वडील भावाला शोभेसाच होता. नव्हे, तो त्याच्याहूनही अधिक बुद्धिमान् आणि ज्ञानाचा जास्त लोभी होता. त्याच्या आकांक्षी मनाला असें वाटूं लागलें कीं, ऱ्हास पावूं लागलेलीं बुद्धधर्माचीं तत्त्वें पुन्हा प्रस्थापित करावीं. तो एकाद्या तापशासारखा राहूं लागला; आणि समोर राजा असो कीं रंक असो, तो सारखाच निस्पृह आहे असें लोकांना दिसूं लागलें.

ह्युएनत्संग वीस वर्षांचा झाला नाहीं तोंच, तो दीक्षितांत मोडूं लागला. विनय ग्रंथाचा त्यानें अभ्यास केला. सूत्रें आणि शास्त्रें हीं त्यानें बारकाईनें पाहिलीं; आणि मग त्याला वाटूं लागलें कीं, आतां राजधानीच्या शहराला जावें; आणि तेथील पंडितांकडून, अभ्यासांत उत्पन्न झालेल्या शंकांचें निरसन करून घ्यावें. परंतु, वडील भावाचा विचार पडला कीं, जाऊं नये. ह्युएनत्संग याची ज्ञानार्जनाची इच्छा इतकी प्रबळ झाली होती कीं, भावाला न विचारतांच कांहीं व्यापाऱ्यांच्या बरोबर तो राजधानी-कडे निघाला. वाट मोठी बिकट होती. ज्या नदींतून त्याची नाव चालली होती, तिचा प्रवाह तीन ठिकाणीं अतिशय अवखळ बनलेला होता. तथापि, ह्युएनत्संग अखेरीस हँग चौला येऊन पोहोंचला; आणि मग, तेथील गृहस्थांनीं आणि शास्त्री–पंडितांनीं त्याचें स्वागत करून, आम्हांला चार अक्षरें ऐकवावीं, अशी विनंति त्याला केली. ह्युएनत्संगनें धर्मग्रंथांचीं तीन पारायणें केलीं. होतां होतां, त्याची कीर्ति राजाच्या कानीं गेली आणि आपल्या सर्व मानकऱ्यांसह राजा प्रवचनाला येणार असें ठरलें. राजदरबारचे मोठमोठे पंडितही सभेला आलेले होते. राजा म्हणाला, "आतां थोडा वाद व्हावा." वादांत असें स्वच्छ दिसून आलें कीं, हा पाहुणा

आलेला नवथर पंडित राजदरबारच्या कोणच्याही मुरब्बी पंडितापेक्षा विद्वान् आहे. राजानें त्याच्यावर दक्षिणेचा वर्षाव केला; पण त्यानें तिला बोटही लावलें नाहीं. येथून पुढें तो चिनचौ येथें गेला. तेथें शिन् या पंडिताच्या हाताखालीं सत्यसिद्ध—व्याकरणशास्त्र या ग्रंथाचा अभ्यास त्यानें केला. पुढें आणखी एका ठिकाणीं जाऊन तो कोशशास्त्र पढला. यानंतर, शँग् आणि पिन् या दोघा पंडितांची आणि त्याची गांठ पडली. चर्चा सुरूं होतांच या महापंडितांना दिसून आलें कीं, हा पोरसवदा पंडित केवळ बृहस्पतीच आहे. ते त्याला म्हणाले, " तुम्हीं जबरदस्त घोडेस्वार आहांत. रोज हजार मैलांची दौड करा. धर्माचा सूर्य तुमच्या हस्तें पुन्हां प्रकाशमान होईल. दुःख येवढेंच वाटतें कीं, आम्हीं त्या वेळीं जिवंत नसूं "

इतकें अध्ययन होतांच ह्युएनत्सँगला दिसूं लागलें की, आतां स्वदेशांत राहण्यांत मतलब नाहीं. आपण अनेक धर्मग्रंथ पाहिले; पण त्यांत फार ठिकाणीं विरोध आहे. आपल्याला पश्चिमेकडेच गेलें पाहिजे. ज्या देशांत बुद्धाचा धर्म जन्म पावला, त्या देशांत जाऊनच, धर्मशास्त्राचा अभ्यास करावा.

परंतु, या काळीं चीनमधून बाहेर पडावयास ' अटक ' होती. तुमच्या बरोबर आम्हींही येऊं असे जे कोणी म्हणाले होते, त्यांनीं हातपाय गाळले. ह्युएनत्सँग चीनमधून बाहेर पडावयास एकटाच निघाला. देवळांत जाऊन त्यानें परमेश्वराची करुणा भाकली; आणि ' ब्राह्मणांचा देश ' जो हिंदुस्थान तिकडे जावयास तो निघाला. आपल्या जन्मकाळीं आईला झालेल्या दृष्टांताचें त्याला स्मरण झालें. स्वप्नांत तिला एका साधुपुरुषानें सांगितलें होतें कीं, " शुभ्र वस्त्र परिधान करून, शास्त्राभ्यासासाठीं तुझा मुलगा पश्चिमेकडील देशांत जाईल." निघावयाच्या वेळीं कांहीं तरी शुभ

शकून व्हावा अशी त्याची इच्छा होती. त्याच दिवशीं रात्रीं त्याला एक मोठें गंमतीचें स्वप्न पडलें. एका विशाल सागराच्या मध्यावर सुमेरु पर्वत उभा आहे; आणि आपण पोहत त्याच्याकडे चाललों आहों. इतक्यांत एक कमलपत्र वर आलें. त्याच्या आश्रयानें आपण पुढें जात आहों. आणि मग वारा सुटून, आणि प्रचंड लाटा उठून, आपण त्या पर्वताच्या शिखरावर जाऊन उभे राहिलों आहों. तेथून चारी दिशांना, विस्तीर्ण प्रदेश पसरलेला आहे, असें त्याला वाटलें. इतकें होतांच तो जागा झाला. या स्वप्नाचा अर्थ हाच आहे कीं, आपण प्रवासाला निघावें, असें त्यानें ठरविलें. या वेळीं त्याचें वय केवळ सव्वीस वर्षांचें होतें !

पश्चिमेकडील प्रवास सुरूं झाल्यावर, त्याचा पहिला मुक्काम लँग चौ येथें पडला. तेथील लोकांनीं विनंति केली कीं, "निर्वाणसूत्र आणि इतर कांहीं ग्रंथ यांवरचीं आपलीं प्रवचनें ऐकण्याची आम्हांस इच्छा आहे." महिना, सव्वा महिना तेथें वसति करून तो पुन्हां मार्गाला लागला. त्याच्या श्रोत्यांनीं त्याला पुष्कळ दक्षिणा देऊं केली. त्यांतली निम्मीच त्यानें घेतली. या द्रव्याचा उपयोग मठांतील दीपमाळा प्रज्वलित करण्याकडे त्यानें केला. नाकारलेली निम्मी दक्षिणा निरनिराळ्या धर्मसंस्थांना वाटून द्या असें त्यानें सांगितलें. या वेळीं देशाचा राज्यकारभार फारसा सुरळीत चाललेला नसल्यामुळें, तेथून बाहेर पडण्याला सर्वांनाच मनाई होत असे. लँग चौचा नगराधिकारी ह्युएनत्सँगला म्हणाला, "तुम्हांला येथून बाहेर जातां येणार नाहीं. तुम्हीं परत राजधानीला जावें हेंच बरें आहे." याप्रमाणें आपल्या या प्रवाशाला अडून पडल्यासारखें झालें. इतक्यांत हुइ वी या नांवाच्या एका पंडिताची व त्याची गांठ पडली. ह्युएनत्सँगचा परदेशगमनाचा हेतू ऐकून या पंडिताला मोठें नवल वाटलें. तो त्याला म्हणाला, "तुमचा हेतु जर शास्त्राभ्यासाचा आहे, तर निर्बंध कांहीं का

असेनात, तुम्हांला मी गुप्तपणें बाहेर पाठवून देण्याची व्यवस्था करतों. " वी लिन् आणि ताऊ चिंग् असे आपले दोन शिष्य त्यानें त्याच्या बरोबर दिले आणि एका अंधाऱ्या रात्रीं हे तिघे नगरांतून निसटले. येता येतां, ते **क्वाचौ** येथें आले. तेथल्या नगराधिकाऱ्यानें त्याची चांगली बडदास्त ठेवली. पुढल्या मार्गाची चौकशी करता असें कळलें कीं, येथून पन्नास 'ली' वर **हुल नांवाची नदी** आहे आणि तिचें वरचें पात्र बरेंच अरुंद आहे. त्या ठिकाणीं एक पूल आहे. तेथें गेलें असतां पश्चिम सरहद्दीपाशीं पोहोंचतां येईल; या **सरहद्दीवर, पांच मोठाले बुरूज** आहेत व ते एकमेकांपासून शंभर ली दूर आहेत. यांच्या दरम्यानच्या सरहद्दीवर पाणी नाहीं कीं झाडही नाहीं. आणि ही हद्द ओलांडून पुढें गेलें म्हणजे मोक्यायेन् या नांवाचें एक वाळवंट लागतें.

ह्युएनँत्सगला काय करावें हें कळेना. तो एक महिनाभर तेथेंच राहिला. दरम्यान्, ज्या लँग चौ गांवांतून तो निसटला होता, तेथील शिपाई क्वा चौला येऊन पोहोंचले. त्यांनीं तेथील अधिकाऱ्याला सांगितलें, " असा ह्युएनत्सँग नांवाचा एक गृहस्थ सिर्फन् म्हणजे तिबेट इकडे जाण्यासाठीं येथें आला आहे. तर त्याला तुम्हीं अडकवून ठेवा." अधिकाऱ्यानें सर्व चौकशी केली. पण स्वतः अतिशय धर्मप्रवण असल्यामुळें तो ह्युएनत्सँगला म्हणाला, " तुम्हांला अडकवून ठेवणें मला प्राप्त आहे. पण तुम्हीं धर्मासाठीं जात आहां. म्हणून मला वरून आलेलें आज्ञापत्र मी तुमच्या देखतच फाडून टाकतों आणि येथून बाहेर पडण्याची तुमची व्यवस्था करतों. " तो तेथून बाहेर पडतांच, बरोबरच्या दोघां लोकांपैकीं ताऊ चिंग् हा म्हणाला कीं, " आतां माझ्याच्यानें पुढें येववत नाहीं. " दुसरा 'येतों' म्हणाला. पण तो इतका अशक्त होता कीं, त्याला हें प्रवासाचें काम निभेल असें ह्युएनत्सँगला दिसेना; म्हणून त्यानें त्यालाही परत धाडलें.

आतां वाटाड्या कोठला आणावा हें त्याला कळेना. म्हणून तो त्या गांवांतील मैत्रेयाच्या देवळांत गेला. त्यानें देवाची प्रार्थना केली कीं, "मला एखादा वाटाड्या दे."

त्या दिवशीं रात्रीं धर्म नांवाचा एक परदेशी भिक्षु त्या देवळांत उतरावयास आला. त्याला त्या दिवशीं स्वप्न पडलें कीं, ह्युएनत्सँग एका कमलपत्रावर बसला आहे आणि पश्चिमेकडे चालला आहे. हें त्याचें स्वप्न ऐकून ह्युएनत्सँगला मनांतून फार आनंद झाला. पण प्रत्यक्ष वाटाड्या अजून मिळालेलाच नव्हता. दुसऱ्या दिवशींच आणखी एक पाहुणा त्या देवालयांत आला. त्यानें बुद्धाच्या मूर्तीची पूजा केली आणि ह्युएनत्सँग-पुढें येऊन त्यानें त्याला तीन प्रदक्षिणा केल्या आणि प्रणाम केला. आपल्याला वाटाड्या मिळणार आहे तो कदाचित् ह्याच असावा, अशी कल्पना होऊन, ह्युएनत्सँगनें त्याला तसें विचारलें. या पाहुण्यानें तें काम एकदमच पत्करलें. त्याला त्यानें एक तट्टू आणावयास सांगितला. दुसरें दिवशीं सकाळीं एका तांबड्या रंगाच्या रोडक्या घोड्यावर बसलेल्या म्हाताऱ्या माणसाला घेऊन हा गृहस्थ ह्युएनत्सँगकडे आला; आणि म्हणाला, "या म्हाताऱ्यानें ह्या सरहद्दीवरून तीस वेळां तरी येजा केलेली आहे; म्हणून तुमच्यासाठीं मीं त्यालाच घेऊन आलों आहे." तो घोड्यावरचा म्हातारा ह्युएनत्सँगला म्हणाला, "शास्त्रीबुवा, तुमचा जीव तुम्हांला नकोसा झाला आहे काय ! अहो, या मुलुखांतून जाणारा माणूस सहसा वाचत नाहीं. येथें वाळू तुडवावी लागते. येथें भुतें खेतें फार. वारा तर इतका कढत वहात असतो कीं, तुम्हीं होरपळूनच जाल." ह्युएनत्सँगनें उत्तर केलें, "घोडेवाले बाबा, तुम्हीं म्हणतां तसें असेलही. मी एक गरीब विचारा भिक्षु आहें. मला शास्त्राचा अभ्यास करावयाचा आहे; आणि त्यासाठीं मला ब्राह्मणांच्या देशांत म्हणजे भारतांत गेलें पाहिजे. मी

मलों तरी बेहत्तर, पण मी तिकडे जाणारच." त्या वृद्ध तट्टूवाल्यानें आपलें घोडें त्याच्या हवालीं केलें आणि तो त्याला म्हणाला, "तुम्हीं या घोड्यावर बसा. इकडल्या प्रदेशांतून यानें पंधरा वेळां ये जा केलेली आहे."

त्या घोड्याकडे पाहिल्यावर ह्युएनत्सँगला एका जुन्या गोष्टीची आठवण झाली. चांगन् येथें असतांना त्यानें हिंदुस्थानांत जाण्याचा बेत जेव्हां कायम केला, तेव्हां एक ज्योतिषीबुवा त्याच्याकडे आले होते. या बुवांना ह्युएनत्सँगनें विचारलें कीं, "मी लवकरच प्रवासाला निघणार आहें. त्याविषयीं तुमचें भविष्य काय आहे?" ज्योतिषीबुवांनीं कांहीं श्लोक म्हटले, आणि ते त्याला म्हणाले, "तुमचा प्रवास एका लाल तट्टावरून होईल. हा तट्टू थकलेला, रोडका आणि अस्थिचर्म झालेला असेल. खोगराला रोगण दिलेलें असेल आणि पुढल्या बाजूनें तें लोखंडी पट्टीनें आवळलें असेल." ह्युएनत्सँग पाहतो तों, त्या म्हाताऱ्याचें घोडें हुबेहूब तसें दिसलें. तोच लाल रंग, तसलेंच खोगीर आणि तीच लोखंडी पट्टी! ह्युएनत्सँगनें आपल्या मनाशीं ठरविलें कीं, मैत्रेयानें हाच घोडा आपल्यासाठीं पाठविला आहे. ह्युएनत्सँग घोड्यावर स्वार झाला. तो दुसरा तरणा माणूस त्याच्याबरोबर चालूं लागला.

येतां येतां, ते त्या नदीपाशीं आले. पात्र पुष्कळच अरुंद होतें. त्या बरोबरच्या माणसानें कांहीं फांद्या तोडून आणून आडव्या टाकल्या; कांहीं डाहळ्या पसरल्या; आणि वर वाळू हांथरली. ह्युएनत्सँगचें घोडें या पुलावरून पलीकडे सुखरूप गेलें! दोघेही दमून गेले होते. पथाऱ्या अंथरून ते झोपीं गेले. थोड्याशा वेळानें तो बरोबरचा माणूस हातांत सुरा घेऊन ह्युएनत्सँगकडे आला. हाही एकदम जागा झाला. इतक्यांत सुरा बाजूला

घेऊन तो माणूस आपल्या बिस्तऱ्याकडे गेला. हें काय आहे हें ह्युएनत्सँगला कळेना. त्यानें धर्मपुस्तकांतील कांहीं स्तोत्रें म्हटलीं आणि बोधिसत्त्वाचें आवाहन केलें. दुसऱ्या दिवशीं तो माणूस म्हणाला, " भले गृहस्थ, आपण काळाच्या तोंडांत चाललों आहों, हें तुम्हांला कळतें काय ? पांचव्या बुरुजापाशीं पोहोंचाल, तेव्हांच तुम्हांला पाणी मिळेल. पण तेथें-सुद्धां अंधारांत गेलें पाहिजे. कारण जर कां कोणी आपल्याला पाहिलें, तर आपण मेलोंच म्हणून समजा. " ह्युएनत्सँगनें त्याला सांगितलें, " बाबा, तूं भीत आहेस असें दिसतें. तूं परत जा. माझ्या या देहाचे तुकडे जरी झाले तरी मी पुढें जाणारच. " तो मनुष्य निघून गेला. आतां ह्युएनत्सँग एकटाच राहिला.

कोठें घोड्याची लीद पडलेली दिसावी, कोठें हाडें पडलेलीं दिसावीं, असें सुरू झालें. पण याच वस्तू त्याच्या वाटाड्या झाल्या. या प्रदेशांतून जातांना त्याला एकाएकीं घोडेस्वारांची एक टोळी दिसली. हे स्वार वेगानें आपल्याकडे दौडत येत आहेत, पण एकाएकीं अंतर्धान पावत आहेत असें वाटावें. कांहीं वेळानें उंटांचा तांडा दिसावा. कांहीं वेळानें हे उंट हवेंत नाहींसे व्हावेत. असा प्रकार चालला होता. ह्युएनत्सँगला पहिल्यानें वाटलें कीं, या चोरांच्या टोळया असाव्यात. पण पुढें पुढें त्याला वाटूं लागलें कीं, हा कांहीं तरी भुताटकीचा खेळ असावा. कांहीं कांहीं वेळां तर ' भिऊं नको, भिऊं नको ' अशा आरोळया त्याच्या कानीं येत. मन कसें तरी शांत ठेवून ह्युएनत्सँग ऐंशी ली पुढें गेला आणि पहिल्या बुरुजापाशीं पोहोंचला. पाण्याच्या झऱ्यावर जाऊन, हात धुवून तो जो पाणी पितो तोंच एक बाण सूं करीत आला आणि त्याच्या गुडघ्याला चाटून गेला. इतक्यांत दुसराही एक आला. तेव्हां तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, " अरे बाबा, मी एक भिक्षु आहे. मला कां मारतोस ? " मग तो आपण होऊनच बुरुजाच्या



वेशीपाशीं गेला. रक्षकानें त्याला विचारलें, " तूं कोण आहेस ? " आपण कोण याची माहिती ह्युएनत्सँगनें त्याला करून दिली आणि तो म्हणाला कीं, " बुद्धधर्मातील धर्मग्रंथांत अपुरेपणा फार आहे; आणि त्यांचा मेळ बसत नाहीं म्हणून मी शास्त्राभ्यासासाठीं भारताकडे जात आहें. तूं जर मला येथें अडकवून ठेवणार असशील तर त्यापेक्षां तूं मला मारून टाकावेंस हें चांगलें. माझें उद्दिष्ट सोडून मी एक पाऊलभर सुद्धां मागें फिरणार नाहीं. " हे त्याचे शब्द ऐकून रक्षकाला गहिंवरून आलें आणि तो त्याला म्हणाला, " मीच तुला पुढली वाट दाखवितों. " दुसरे दिवशीं या रक्षकानें त्याचा पाण्याचा चंबू भरून दिला; पुष्कळशा दशम्या बांधून दिल्या; आणि पुढल्या बुरुजावरील रक्षकांची माहिती सांगून त्यानें त्याला वाटेस लावलें.

रात्रींच्या सुमारास ह्युएनत्सँग चवथ्या बुरुजापाशीं पोहोंचला. तेथें पाणी आणावयास जातो, तों मागला अनुभव पुन्हां आला. अंगावर तीर येऊं लागले. तेव्हां तो पुढें होऊन मोठ्यानें ओरडला कीं, "मी हिंदुस्थानांत चाललों आहें. पहिल्या बुरुजावरील अधिकाऱ्यानें मला तुमच्याकडे पाठविलें आहे." बुरुजाच्या अधिकाऱ्यानें पुढें येऊन त्याचें स्वागत केलें आणि त्याला तेथें राहवून घेतलें. सकाळीं त्यानें त्याला पाण्यासाठीं कातड्याची पिशवी दिली; त्याच्या घोड्याला वैरण दिली; आणि तो त्याला म्हणाला कीं, "आतां पांचव्या बुरुजाकडे तुम्हीं जाऊंच नका. कारण, तेथलीं माणसें फार उर्मट आहेत. तीं तुमच्या अंगावरही येतील. तुमचें बरेंवाईटसुद्धां होईल. येथून शंभर लीवर यिमा नांवाची विहीर आहे. तिकडे तुम्हीं जा."

त्याचा निरोप घेऊन ह्युएनत्सँग निघाला आणि मोक्यायेन या वाळवंटांत शिरला. हें वाळवंट आठशें ली लांब आहे. तेथे एकही पशुपक्षी दिसत नाहीं. पाणी नाहीं. झाड नाहीं. झुडुप नाहीं. असें हें रखरखीत मैदान आहे. वाटचाल करतांना ह्युएनत्सँग बोधिसत्त्वाचें नांव घेई आणि प्रज्ञा-परमित-हृदयसूत्राचा पाठ करी. हें सूत्र मोठें गुणकारी आहे असें त्याला एका भिक्षूनें सांगितलें होतें. मोक्यायेन वाळवंटांतून जातांना आपल्या आजूबाजूला व मार्गेपुढें मोठमोठाले राक्षस आणि भुतेंखेतें चाललीं आहेत, असें त्याला वाटूं लागलें. त्यांना घालवावें म्हणून बोधिसत्त्वाचा जप त्यानें करून पाहिला, पण तीं दाद देईनात. मात्र प्रज्ञा–परमित–हृदय–सूत्राचा पाठ सुरू झाल्याबरोबर एका क्षणांत तीं नाहीशीं होऊं लागलीं. अर्थात् कसलाही धोका उत्पन्न झाला, तरी या सूत्रपाठानें तो दूर होतो, अशी त्याची खात्री होऊन चुकली.

शंभर ली गेल्यावर, तो वाट चुकला आणि यिमा विहीर त्याला सांपडली नाहीं. जवळच्या पाण्याच्या पिशवीचें तोंड ओंठाला लावतो तों, ती जड पिशवी हातांतून निसटली आणि एक हजार लीपर्यंत पुरण्यासारखें पाणी वाळूंत सांडून गेलें. रस्ताही नीट सांपडेना आणि कोठें जावें हें कळेना. शेवटीं परत फिरावें आणि चवथ्या बुरुजाकडे जावें असें त्यानें ठरविलें. पण पुन्हां आपल्या प्रतिज्ञेचें स्मरण त्याला झालें, मेलों तरी बेहत्तर पण शास्त्राच्या अभ्यासासाठीं हिंदुस्थानांत जाणारच जाणार, असें म्हणून त्यानें बोधिसत्त्वाचें नांव घेतलें आणि वायव्येच्या रोखानें तो निघाला. कोणच्याही दिशेकडे पाहिलें तरी चिटपाखरूं त्याला दिसेना. मात्र रात्रीच्या वेळीं, त्या वाळवंटावर ठिकठिकाणीं वेताळांच्या आगट्या त्याला दिसूं लागल्या. परंतु, कांहीं झालें तरी, आतां भ्यावयाचें नाहीं, असें त्यानें ठरविलें होतें. पण पाण्याविणें त्याच्या घशाला कोरड पडली. चार दिवस आणि चार रात्री अशा गेल्या कीं, तोंडांत पाण्याचा थेंबही त्याला घालतां आला नाहीं. पोटांत आग पडली. आपण आतां खालीं कोसळणार, असें त्याला वाटूं लागलें. शेवटीं, तो त्या वाळूवर खरोखरीच आडवा पडला. जीव अगदीं हलक झाला होता तरी, त्याचा बोधि-सत्त्वाचा जप मधूनमधून चाललाच होता. तो बोधिसत्त्वाला म्हणाला, " हा ह्युएनत्सँग प्रवासाला कशासाठीं निघाला आहे बरें ? त्याला पैसा हवा का कीर्ति हवी ? त्याला काय हवें आहे ! शुद्ध धर्मतत्त्व कोणतें आहे आणि खरें शास्त्र कोणतें आहे हें कळावें म्हणूनच मी हें सतीचें वाण घेतलें आहे ना ? बोधिसत्त्वा, तूं प्राणिमात्रावर दया करतोस आणि त्यांचें संकट निवारितोस. मग माझीच हांक तुला कशी रे पोहोंचत नाहीं? "

पांचव्या दिवशीं अशाच प्रार्थना चालू असतांना, एकाएकी गार वारा सुटला आणि अंगावर बर्फाच्या पाण्याचा वर्षाव होत आहे, असें

त्याला वाटलें. उन्हानें त्याच्या डोळ्यांना दिसेनासें झालें होतें. त्याचें तें तांबडें घोडें जागचें हलेनासें झालें होतें. या गार वाऱ्यानें त्याची दृष्टिही निवळली आणि त्याला एकदम झोंप लागली. असल्या झोपेंत त्याला स्वप्न पडलें. एक भव्य सत्पुरुष आपल्यापुढें येऊन उभा राहिला आहे असें त्याला वाटलें. तो त्याला म्हणाला, " तूं येथें कशासाठीं निजून राहिला आहेस ? थोडी कळ काढ आणि आपला प्रवास पुन्हां सुरूं कर." ह्युएनत्सँग जागा झाला आणि मार्गाला लागला.

दहा ली गेल्यावर, तें घोडें एकदम तट्कन् बाजूला वळलें. लगाम खेंचला तरी तें मूळ वाटेवर येईना. शेवटीं तें कोठें जाईल तिकडे जावो, असें म्हणून ह्युएनत्सँग वर गप्प बसून राहिला. गंमत ही कीं, थोडेसें अंतर जातांच एक हिरवेंगार मैदान त्याला दिसूं लागलें. मैदानावर येतांच त्यानें घोडें चरणीला लावलें आणि आजूबाजूला पाहतो तों त्याला पाण्याचा एक स्वच्छ झरा दिसला. ओंजळी भरभरून तें गार आणि स्फटिकासारखें स्वच्छ पाणी तो प्याला. त्याच्या सर्व शक्ति पुन्हां परत आल्या. घोडेंही ताजेतवानें झालें. ह्युएनत्सँगनें आपल्याशीं म्हणाला, " या असल्या रखरखीत वाळवंटांत, ही गवताळ जमीन आणि पाण्याचा झरा येणार तरी कोठून ? बोधिसत्त्वानें माझ्यावर करुणा केली. केवळ माझ्यासाठीं त्यानें हें हिरवेंगार गवत आणि हें मधुर जल उत्पन्न केलें हेंच खरें."

एक दिवस तो तेथें स्वस्थ पडून राहिला. दुसऱ्या दिवशीं आपल्या पाण्याची पिशवी त्यानें भरून घेतली आणि घोड्यासाठीं गवतही कापून घेतलें. दोन दिवसांनीं तो इगु शहरांत येऊन पोहोंचला. एका देवळांत जाऊन तो टेकला, तों त्याला तेथें तीन चिनी भिक्षु भेटले. परस्परांची ओळख पटल्यावर, सर्वांनाच इतका आनंद झाला कीं, एकमेकांना भेटून

ते ढसढसा रडूं लागले. ह्युएनत्सँग हा पंडित आपल्या गांवाला आलेला आहे असें ऐकतांच तेथील राजा त्याच्या भेटीला आला आणि त्यानें त्याचें चांगलें आगत-स्वागत केलें. दरम्यान् काऊ चँग् येथील राजाचा त्याला निरोप आला कीं, आपण आमच्याही राज्यांत यावें. नाहीं होय करतां करतां, त्यानें हें आमंत्रण पत्करलें आणि सहा दिवस आणखी एक वाळवंट तुडविल्यावर, पिह्ली या त्याच्या राजधानीला तो येऊन पोहोंचला. राजा, राणी आणि राजाची आई त्याला येऊन भेटलीं आणि आतां आमच्याच राज्यांत आपण कायमचें रहावें, असें तीं म्हणूं लागलीं. ह्युएनत्सँगनें पहिल्या पहिल्यानें तें हसण्यावारी नेलें, पण त्याला पुढें दिसूं लागलें कीं, राजा अतिशय हट्टी आहे. तो ह्युएनत्सँगला म्हणाला, " तुम्ही पुष्कळ जाणार असाल, पण मीं तुम्हांला सोडलें पाहिजे ना!" " मी धर्मशास्त्राच्या अभ्यासासाठीं जात आहें. चीन देशांतील बुद्धाच्या ग्रंथांत विरोध फार आहेत. ते नाहीसे करून घेण्यासाठीं मला ब्राह्मणांच्या देशांत गेलें पाहिजे." असें त्यानें नाना प्रकारांनीं विनवून पाहिलें, पण तो मुर्दाड राजा त्याला सोडीच ना. शेवटीं ह्युएनत्सँगनें अन्नपाणी वर्ज्य केलें; तीन दिवस आणि तीन रात्रीं त्यानें निश्चक्र उपवास केला आणि त्याला पुन्हां पुन्हां ग्लानी येऊं लागली. राणीसाहेब आणि मासाहेब घाबरल्या आणि राजाही मनांत वरमला. तो म्हणाला, " महाराज, तुम्हीं आतां उपवास सोडा, मी तुम्हांला खचित जाऊं देतों. पण तुम्हीं एक महिनाभर तरी येथें रहा." ह्युएनत्सँगनें तें खुषीनें मान्य केलें आणि उपवासाचें पारणें फेडलें.

महिनाभर त्याचीं प्रवचनें झालीं आणि मग राजानें पश्चिमेकडे जाण्यास त्याला खुषीनें परवानगी दिली.

जातां जातां तो ओकिनी या राज्यांत आला. आफू नांवाचा जो एक सुप्रसिद्ध पाणलोट आहे तो याच देशांत आहे. ह्युएनत्सँग यानें या

पाणलोटाच्या काठीं एक रात्र मुक्काम केला आणि मग, दुसऱ्या दिवशीं **'रुप्याचा पर्वत'** ओलांडून तो पुढें गेला. हा पर्वत फार उंच आणि विशाल आहे. पश्चिमेकडील देशांत चांदीचें नाणें चालतें. ती सारी चांदी याच पर्वताच्या खाणींतून जाते. पुढें गेल्यावर, त्याला पुष्कळच भामटे भेटले. पण त्यांच्या तावडींतून तो कसा तरी सुटला. कारण पिहलीच्या राजानें त्याच्याबरोबर बरींच माणसें दिलेलीं होतीं. जातां जातां तो **ओकीन** या राजधानीच्या गांवाला येऊन पोहोंचला. तेथील राजानेंही त्याचें चांगलें स्वागत केलें. नद्या आणि दरींखोरीं ओलांडतां ओलांडतां, कित्येक ली गेल्यावर तो **कियुची** या राज्यांत येऊन दाखल झाला. त्या देशाचा राजा आणि मोक्षगुप्त नांवाचा एक दरबारांतील पंडित हे त्याला भेटावयास आले. त्यानीं त्याची मोटी मिरवणूक काढली. राजानें ह्युएनत्सँगची बडदास्त फार चांगली ठेवली. मोक्षगुप्त ही एक मोठी बडी आसामी होती. आसपासच्या टापूंत त्याच्या येवढा दुसरा विद्वान् कोणीही नव्हता. या विद्वानाला वाटलें कीं, ह्युएनत्सँग म्हणजे कांहीं शास्त्रांचें मुखावलोकन केलेला एक साधा भिक्षु असेल. एकदां वादाला आरंभ झाला आणि मोक्षगुप्त अनेक शास्त्रांचीं नांवें सांगूं लागला. ह्युएनत्सँगनेंही आपलें ज्ञानभांडार उघडलें आणि प्रतिप्रश्नांची फैर चालू केली. त्याबरोबर हा पंडित अगदीं ढेपाळला आणि म्हणूं लागला कीं, " मी आतां वृद्ध झालों आहें, म्हणून मला सूत्र पाठ आठवत नाहींत." या राजधानींत ह्युएनत्सँग दोन महिने राहिला. कारण वाटेंत पुढें असलेल्या **लिंग पर्वताचे** घाट बर्फानें भरून गेलेले होते. मुक्काम हलवून ह्युएनत्सँग निघाला तेव्हां राजानें त्याच्याबरोबर पुष्कळ उंट, घोडे आणि नोकरचाकर दिले.

हजारों ली चालून गेल्यावर तो **लिंग पर्वतापाशीं** आला. याचीं शिखरें अस्मान उंच असून, त्यांच्यावर बर्फाचे थरच्या थर सांठलेले होते.

सूर्याच्या किरणांनीं तीं एकदां चमकूं लागलीं म्हणजे त्यांच्याकडे बघण्याची सोय नसे. या पर्वताच्या परिसरांतून बाहेर पडावयास ह्युएनत्सँगला सात दिवस लागले आणि लवकरच तो सिंग नांवाच्या सरोवरावर येऊन ठेपला. वायव्येच्या रोखानें बराच प्रवास केल्यावर, येहू या नांवाच्या तुर्की खानाची आणि त्याची गांठ पडली. खानानें त्याला कांहीं दिवस राहवून घेतलें. हे तुर्क लोक अग्निपूजक होते. ते खुर्च्यांवर वगैरे बसत नसत. कारण, लाकडात अग्नि असतो आणि आपण त्यावर बसलों तर अग्नि-देवतेचा अपमान होईल असें त्यांना वाटे. चटया पसरूनच पाहुण्यांसह राजा आणि त्याचे मानकरी हे बसले आणि मेजवानीला सुरवात झाली. ह्युएनत्सँगला आपलें मांसमसकण चालावयाचें नाहीं हें खानाला माहीत होतें, म्हणून त्यानें तांदुळाचे घावन करविले होते; त्यावर साईचें दहीं वाढलें आणि वर साखरही पेरली व निरनिराळ्या तऱ्हेचीं फळेंही पाहुण्या-पुढें ठेवलीं. जेवण आटोपल्यावर खान म्हणाला कीं, " महाराज, आतां थोडें प्रवचन करावें. " प्रवचन ऐकतांच खान आनंदानें बेहोष होऊन गेला. नंतर निरनिराळ्या तऱ्हेचीं उंचीं वस्त्रें अर्पण करून खानानें ह्युएनत्सँगला निरोप दिला.

पुढें जातां जातां ते एका नास्तिकांच्या देशांत आले. येथला राजा पहिल्या पहिल्यानें ह्युएनत्सँग याच्याशीं मोठ्या तिरस्कारानें बोलूं लागला. पण राजापुढें जेव्हां त्याचें ज्ञानभांडार खुलें होऊं लागलें, तेव्हां तो अगदीं वरमला आणि शेवटीं " आम्हांला बुद्धधर्माची दीक्षा द्या " अशीच विनवणी त्यानें केली !

पुढें या प्रदेशांतून त्या प्रदेशांत असें करतां करतां, तो **ऑक्सस नदीच्या खोऱ्यांत** येऊन ठेपला. तेथील राजानें त्याचें चांगलें स्वागत केलें आणि तो त्याला म्हणाला, " आपण येथें कांहीं दिवस मुक्काम

करा, आपली प्रकृति नीट दिसत नाहीं. जरा बरें वाटूं द्या. मग मीच तुम्हांला ब्राह्मणांच्या देशांत स्वत: घेऊन जाईन." या देशांत धर्मसिंह नांवाच्या एका श्रमणाची आणि त्याची गांठ पडली. या श्रमणानें शास्त्राभ्यासासाठीं कांहीं दिवस हिंदुस्थानांत घालविलेले होते आणि लोक त्याला मोठा विद्वान् समजत. काशगर, खोतान इकडील भिक्षूंची त्याच्या-पुढें बोलण्याची प्राज्ञा नव्हती; पण ह्युएनत्सँगनें त्याचा पहिल्याच बैठकींत गर्वपरिहार केला. येथून निघून ह्युएनत्सँग बक्त्र ( बॅक्ट्रिया ) देशांत आला. या देशाच्या राजधानीला छोटें राजगृह असें म्हणत असत. बक्त्र देशांत शेंकडों भिक्षू होते. त्यांचा निरोप घेऊन तो बल्क येथें आला. येथून पुढें, त्याला संघाराम या इमारती सगळीकडे भेटूं लागल्या. या नगरीच्या बाहेरच्या अंगाला नव संघाराम होता. "ही इमारत मोठी भव्य असून, त्यांतील बुद्ध–मंदिरांत बुद्धाचा चंबू ठेवलेला आहे. येथें बुद्धाचा एक दांतही आहे. हा दांत एक इंच लांब असून, पाऊण इंच रुंद आहे. याचा रंग पिवळसर पांढरा आहे. या दांतांतून कांहीं एक विलक्षण लखलखीत तेज नेहमींच झळकत असतें. येथें एक बुद्धाची केरसुणी ठेवलेली आहे. ही कुश गवताची केलेली असून ती तीन फूट लांब आहे आणि तिच्या दांड्याला रत्नें लावलेलीं आहेत. विशेष मंगल-प्रसंगीं सर्व लोक या वस्तूंची पूजा करतात. जे श्रद्धाळू आहेत, त्यांना तर वाटतें कीं, कांहीं एक आत्मिक तेज यांतून बाहेर पडत आहे.

"उत्तरेच्या बाजूला दोनशें फूट उंच स्तूप आहे आणि नैर्ऋत्येला एक विहार आहे. निर्वाणपदाला गेलेल्या भिक्षूंचीं स्मारकें येथें केलेलीं आहेत. या शहरांत आणखी दोन स्तूप आहेत. बुद्धाला जेव्हां ज्ञानप्राप्ती झाली, तेव्हां त्यानें आपल्या तत्त्वांचा उपदेश केला आणि दहा शिक्षापदी शिकविल्या. तथागतानें आपल्या व्यापारी शिष्यांना आपलीं कांहीं नखें

आणि केसांच्या बटा दिल्या आणि यांवर स्तूप बांधा म्हणून सांगितलें. हे व्यापारी शिष्य आपल्या देशाला म्हणजे बल्ककडे गेले आणि तेथें त्यांनीं हे दोन स्तूप बांधले." येथेंच प्रज्ञाकर या भिक्षूची व त्याची गांठ पडली. त्याच्याकडून ह्युएनत्सँगनें कोश आणि विभाषा यांतील कांहीं शंकांचें निरसन करून घेतलें.

प्रज्ञाकराला बरोबर घेऊन ह्युएनत्सँग बर्फमय प्रदेशांतील **बामियान् राज्यांत** आला. या प्रदेशांत त्याचे फारच हाल झाले. पण तो तथागताचा खराखरा शिष्य होता, म्हणूनच तगून राहिला. या ठिकाणीं महासंधिक पंथाचे आर्यदास आणि आर्यसेन असे दोन भिक्षू त्याला भेटले. त्यांनीं त्याला तेथील सर्व स्थळें दाखविली. शहराच्या ईशान्य बाजूला एका टेकडीच्या उतारावर दीडशें फूट उंचीची एक मूर्ति त्याला दिसली. तिच्या पूर्वेला एक संघाराम होता आणि पलीकडे शाक्य मुनीची एक मूर्ति होती. निर्वाणपद प्राप्त झाल्यावर निद्रावश झालेल्या बुद्धाची एक हजार फूट लांबीची मूर्ति संघारामांत ठेवलेली होती. तेथून जवळच एका दरींत आणखी एक संघाराम होता. यांत बुद्धाचा एक दात ठेवलेला होता. हा दांत पाच इंच लांब असून जवळ जवळ चार इंच रुंद होता ! तेथें एका चक्रवर्ती राजाचाही एक दांत होता. तोही तीन इंच लांब आणि दोन इंच रुंद होता. हा बर्फमय प्रदेश मागें टाकल्यानंतर, ह्युएनत्सँग एका क्षत्रिय राजाच्या राजधानींत आला. येथील बुद्ध–मंदिराच्या एका दरवाजांत एक उंच मूर्ति उभी होती. हिच्या सिंहासनाखालीं असंख्य रत्नें पुरून ठेवलेली आहेत असें त्याला कळलें. या रत्नांचा उपयोग मंदिराची कांहीं दुरुस्ती करण्याचा प्रसंग आला, तरच व्हावयाचा होता. या ठिकाणीं प्रज्ञाकरानें ह्युएनत्सँगची रजा घेतली आणि तो

बल्कला परत निघून गेला. सहाशें ली पूर्वेकडे आल्यावर ह्युएनत्सँग **हिंदुस्थानांत** पोहोंचला.

त्याला पहिला प्रदेश लागला तो **लांघान** हा होय. महायान पंथाचे कितीतरी भिक्षू त्याला येथें भेटले. दक्षिणेकडे तीन दिवस वाटचाल झाल्यावर त्याला एक स्तूप लागला. बुद्धाचा मुक्काम या ठिकाणीं एकदां पडलेला होता म्हणून हा स्तूप बांधलेला होता. याच्या उत्तरेकडील सर्व मुलुखाला म्लेंच्छ देश असें म्हणत असत. इकडील लोकांना आपल्या धर्माचें तत्त्वज्ञान सांगण्यासाठीं जेव्हां बुद्ध जाई, तेव्हां तो हवेंतूनच जात येत असे. कारण त्यानें जर भूमीवर पाऊल टेकलें तर भूमि भयानें थरथर कांपत असे. तेथून तो **नगरहार** देशांत आला. राजधानीच्या जवळच अशोकानें बांधलेला एक स्तूप आहे. या स्तूपाला ह्युएनत्सँगनें प्रदक्षणा घातल्या आणि नमन केलें.

आग्नेयेच्या रोखानें थोडेसें गेल्यावर, **हिड्डा** नांवाच्या **गांवाला** तो आला. “ येथें एका लहानशा स्तूपांत तथागताच्या मस्तकाची कवची ठेवलेली आहे. तिच्यावरचीं केसांचीं छिद्रें स्वच्छ दिसतात. कवची पिवळसर पांढरी आहे आणि ती एका रत्नजडित पेटींत ठेवलेली असते. आपण पापी आहों कीं पुण्यवान् आहों, हें जर कोणाला पहावयाचें असलें तर, रेशमी रुमालावर सुगंधित मेण सारवावें आणि तें या कवचीवर दाबावें. मेणाचा रुमाल परत उचलून घ्यावा. त्यावर उमटलेल्या खुणांवरून आपण पापी कीं पुण्यवान् हें ठरवावें, अशी चाल आहे. ” ह्युएनत्सँग यानें असाच एक रुमाल दाबून पाहिला. तेव्हां त्या मेणावर, बोधिवृक्षाचें चित्र उमटलेलें दिसलें. त्याच्याबरोबरच्या दोघां श्रमणांनीं रुमाल घालून पाहिले, तेव्हां एकाच्या मेणावर बुद्धाचें चित्र आलें आणि दुसऱ्याच्या मेणावर कमळाचें चित्र आलें. “ येथें आणखी एका लहानशा स्तूपांत बुद्धाचें

बुबुळ ठेवलेलें आहे. हें चांगलें आंब्याएवढें मोठें आहे; शिवाय तें इतकें तेजस्वी आहे कीं, त्याचीं किरणें कितीतरी दूरवर पडतात. येथेंच फार तलम सुती कापडाचा बुद्धाचा एक आंगरखा आहे. त्याच्याच शेजारीं बुद्धाचा चंदनाचा सोटा ठेवलेला असून, त्याला कथलाच्या मायण्या बसवलेल्या आहेत." ह्युएनत्सँगनें या सर्व वस्तूंचें दर्शन मोठ्या भक्तिभावानें घेतलें; त्यांच्यापुढें सोन्यारुप्याची दक्षिणा ठेवली; त्यांना फुलें वाहिली आणि त्यांच्यापुढें साष्टांग दंडवत घातलें. इतकें करून तेथून तो निघाला.

दीपंकर नगराच्या नैर्ऋत्येला नागराज गोपाळ याची एक गुहा आहे असें त्याला कळलें. या नागराजाला तथागतानें अगदीं माणसाळवून टाकलें होतें. शेवटीं आपली साक्ष म्हणून आपली सावली तथागतानें या गुहेंत ठेवून दिली. गुहेंत जाऊन तिची पूजा करावी अशी इच्छा ह्युएनत्सँगला झाली. परंतु, त्याला लोकांनीं सांगितलें कीं, तुम्हीं तिकडे जाऊं नये. तिकडे चोर आणि लफंगे लोक फार आहेत. तिकडे जे जातात ते सहसा परत येत नाहींत. तरीहि तथागताची छाया प्रत्यक्ष पहावयास सांपडते तर ती पाहिलीच पाहिजे, असें ठाम ठरवून तो तिकडे निघाला. जातां जातां आणि चौकशी करतां, एका वृद्ध माणसानें त्याला सांगितलें "तुम्हीं गुहेंत शिरलांत, म्हणजे सरळ पूर्वेकडील भिंतीकडे जा. ती भिंत लागली म्हणजे बरोबर पन्नास पावलें मागें या आणि पुन्हां त्या भिंतीकडे पहा. तेथें तुम्हांला ती सावली दिसेल." ह्युएनत्सँग गुहेंत शिरला आणि वृद्धानें सांगितलें होतें, त्याप्रमाणें त्यानें केलें. पण तथागताची सांवली त्याला दिसेना. तो अगदीं खिन्न होऊन गेला. त्यानें स्तोत्रें म्हणावयास सुरवात केली. एक श्लोक झाला कीं एक नमस्कार घालावा, असे शेकडों नमस्कार त्यानें घातले. मग पूर्वेकडील भिंतीवर वाडग्याच्या आकाराचा उजेड दिसूं लागला, पण तो एकाएकीं नाहींसा झाला. तो पुन्हां दिसला; पुन्हां गेला. ह्युएनत्सँगनें

पुन्हां एकदां शेकडोशें नमस्कार घातले. मग गुहेंत जिकडे तिकडे लख्ख प्रकाश पडला आणि तथागताची पांढरी शुभ्र छाया त्याला दिसूं लागली. तें तेजस्वी दैवी रूप पाहून याचें वर्णन तरी कसें करावें असें त्याला झालें. बुद्धाचा देह आणि त्याचीं काषाय वस्त्रें हीं पिवळसर तांबूस रंगाचीं दिसलीं. बुद्धाचें ध्यान पाहून ह्युएनत्सँग हर्षभरित होऊन गेला. त्यानें नमन केलें,



स्तवन केलें, फुलें वाहिलीं, धूपदीप दाखविले आणि मग ती छाया अंतर्धान पावली. बरोबर आलेला ब्राह्मण त्याला म्हणाला, " महाराज, आपण जर येथें आलां नसतां तर ही छाया मला दिसली नसती. "

वाटचाल करतां करतां, ह्युएनत्सँग गांधार देशांत आला. त्याला सिंधु नदीही लागली आणि तो पुरुषपूर म्हणजे पेशावर येथें येऊन पोहोंचला. नारायण–देव, असंगबोधिसत्व, वसुबंधुबोधिसत्व, धर्मत्रात,

मनोह्त व पार्श्विक अशासारखे मोठमोठाले संत व महंत याच देशांत होऊन गेले होते. " पुरुषपुराच्या शेजारीं एक पिप्पल वृक्ष आहे. हा बारा तेरा पुरुष उंच आहे. बुद्ध धर्मीयांचें म्हणणें असें आहे कीं, अजून नऊशेंशहाण्णव बुद्ध येतील आणि ते याच झाडाखालीं बसतील. पलीकडेच एक कनिष्क राजाचा स्तूप आहे. शेजारीं पांढऱ्या शुभ्र पाषाणांतून कोरलेली एक दोन पुरुष उंचीची मूर्ति आहे. तेथील लोक सांगतात कीं, ही मूर्ति रात्रीच्या वेळीं त्या स्तूपाला प्रदक्षिणा घालते. "

तेथून ह्युएनत्सँग **पुष्कलावतीला** आला. अशोकानें बांधलेला एक स्तूप त्यानें पाहिला. नंतर तो **उद्यान** गांवाला आला. " शुभवास्तु नदीच्या कांठीं पूर्वी चौदाशें संघाराम होते आणि तेथें अठरा हजार भिक्षु रहात असत. पण आतां तेथें अगदीं शुकशुकाट झालेला आहे. " येतां येतां, अशोकानें बांधलेल्या रोहितक स्तूपापाशीं तो आला. सिंधु नदी ओलांडून तो पुढें **तक्षशिलेला** आला. " या ठिकाणीं एक अशोकाचा स्तूप आहे. याच्या अंगांतून नेहमीं एक पवित्र तेज बाहेर पडत असतें. तेथून २०० ली पुढें गेलें म्हणजे मोठ्याला खडप्यांतून गेलेला एक घाट आपल्याला लागतो. तेथून पुढें १००० ली गेलें म्हणजे आपण **काश्मीरांत** उतरतों."

ह्युएनत्सँग राजधानीच्या गांवांत येतांच राजाची आई आणि भाऊ हे त्याला सामोरे आले. त्या दिवशीं रात्रीं काश्मीरांतील उपाध्याय मंडळींना दृष्टांत झाला कीं, " महाचीनांतून कोणी एक भिक्षु येथें आला आहे. त्याला धर्मशास्त्रांचा अभ्यास करावयाचा आहे आणि पवित्र स्थलांची यात्रा करावयाची आहे. ध्यानांत ठेवा कीं, या भिक्षूच्या शरीराभोंवतीं यक्षांचा पहारा आहे. याचा सत्कार करण्यांत महापुण्य आहे. उठा आणि त्याचें दर्शन घ्या ! " राजासकट सर्व लोक या पाहुण्यावर अगदीं खूष होऊन गेले. राजवाड्यावर त्याचा आदर-सत्कार झाला. दरबारच्या

पंडितांशीं त्याची कांहीं चर्चाही झाली. या पंडितांतील जो सर्वमान्य विद्वान् होता त्याची बुद्धिमत्ता, तर्कशक्ति, शास्त्रज्ञान आणि आत्मिक बल हीं पाहून ह्युएनत्सँग हर्षभरित आणि विनम्र झाला. त्याच्यापाशींच शास्त्राध्ययन करावें असें त्याला वाटूं लागलें. कोशशास्त्र, न्यायानुसारशास्त्र, हेतुविद्याशास्त्र इत्यादि शास्त्रें तो त्याच्यापाशीं पढला. तेव्हां त्या ग्रंथांत क्लिष्ट वाटत असलेलीं स्थळें त्याला नीट समजूं लागलीं आणि कांहीं कांहीं परमार्थ–विचाराच्या गूढ प्रमेयांचा उलगडा झाला. येथें ह्युएनत्सँग दोन वर्षें राहिला. शास्त्रांचा आणि सूत्रांचा अभ्यास त्यानें पुरा केला. त्यानें आजूबाजूच्या यात्रा केल्या आणि या देशाचा निरोप घेतला.

दक्षिणेकडे येता, तो **राजपुरीला** आला. मग **चंद्रभागा** म्हणजे **चिनाब नदी** ओलांडून तो जयपूरला आला. अनेक गावें करीत करीत **नरसिंह-नगरीच्या** जवळील पलाशवनांत तो पोहोंचला. या वनांत त्याची कांहीं चोरट्यांशीं गांठ पडली. त्यांनीं ह्युएनत्सँगला अगदीं लुबाडलें. परंतु, जिवानिशीं सुटलों येवढ्यावरच त्यानें समाधान मानलें! तेथून पुढें ठक्का राज्यांतील **लाहोर** शहराला तो आला. गांवाच्या बाहेर एक विस्तीर्ण आंबराई होती. या आंबराईत एका ब्राह्मणाचा आश्रम होता. " ह्या ब्राह्मणाचें वय सातशें वर्षांचें आहे, पण तीस वर्षांच्या बांडासारखा तो दिसतो. त्याचें शरीर मोठें बांधेसूद असून, त्याची अंगकांतीही प्रेक्षणीय आहे. बुद्धीचें लेणें त्याला देवानेंच दिलें आहे. त्याच्या तर्कशक्तीची भरारी फारच उंच आहे. प्राण्यमूल आणि शातशास्त्र यांचा अभ्यास त्यानें फारच चांगला केलेला आहे. त्याचें वेदांचें अध्ययनही तसेंच गहन आहे. त्याचे दोघे शिष्यही शंभर शंभर वर्षांचे आहेत." त्यानें ह्युएनत्सँगचें स्वागत केलें आणि गांवांत जी थोडीशी बुद्ध लोकांची वस्ती होती तेथें त्यानें त्याच्या जेवणाची सोय करून दिली. बाकीचें तें

विशाल-नगर पाखंडवादी माणसांनींच-म्हणजे आर्यधर्मीय-लोकांनीं (?) भरलेलें होतें. येथें ह्युएनत्सँग याचें मोठें प्रवचन झालें आणि लोकांनीं त्याच्या मताचा जयजयकार केला.

येथून ह्युएनत्सँग जालंदर येथें आला. येथें तो चार महिने राहिला. प्रकरणपादविभाषा शास्त्राचा अभ्यास चंद्रवर्मा या शास्त्र्याच्या हाताखालीं त्यानें केला. दक्षिणेकडे येतां येतां तो मथुरेला आला. थोडा आग्नेयीकडे वळून तो स्थानेश्वरला गेला आणि पुढें यमुनेच्या कांठीं जाऊन पोहोंचला. यमुना ओलांडून शेवटीं तो पवित्र गंगा नदीवर आला. " या नदीचें पाणी मधुर आहे आणि अतिशय हलकें आहे. या नदीच्या पाण्याबरोबर अतिशय सूक्ष्म वाळू वहात असते. ग्रंथांत या नदीला तीर्थ म्हणून म्हटलेलें आहे. जे या नदींत स्नान करतात ते पापापासून मुक्त होतात आणि स्वर्गांत जातात, असें येथील ग्रंथांत सांगितलेलें आहे. साहाजिकच या नदीच्या तीरावर लोकांचे थवेच्या थवे जमत असतात, परंतु या लोकांचा हा समज चुकीचा आहे."

येथून पुढें तो मतिपुराला गेला. " येथील राजा शूद्र जातीचा आहे व येथील लोक हीनयानाचा अभ्यास करतात. येथून तो उत्तरेकडे ब्रह्मपुरीला गेला आणि आग्नेयेकडे उतरून अहिक्षेत्रावर आला. गंगा नदी उतरून पुन्हां वायव्येकडे गेल्यावर तो कनोजला येऊन पोहोंचला. " ह्या राज्याचा घेर सुमारें आठशें, नऊशें मैल असून राजधानी गंगेच्या पश्चिम तीरावर आहे. ही सुमारें २० ली लांब आहे व पांच सहा ली रुंद आहे. येथला राजा रजपूत असून त्याचें नांव हर्षवर्धन असें आहे. त्याच्या बापाचें नांव प्रकरवर्धन होतें व त्याच्या वडील भावाचें नांव राज्यवर्धन होतें. हर्षवर्धन हा अतिशय सद्गुणी आणि देशाभिमानी राजा आहे. लोक नेहमींच त्याचें स्तवन करीत असतात. राज्यवर्धन हा गादीवर असतांना

पूर्व भारतांतील कर्णसुवर्णचा राजा शशांक याला त्याच्या क्षात्रगुणांचा मोठाच मत्सर वाटूं लागला व म्हणून कट करून त्यानें त्याला ठार मारलें. प्रधानांनीं त्याचा धाकटा भाऊ शिलादित्य याला गादीवर बसवलें. याचेंच नांव शिलादित्य हर्षवर्धन.'' याच्या मुखावर राजतेज झळकत असे आणि त्याची चालचलणूकही मोठी रुबाबदार असे. त्याच्या क्षात्रतेजाबद्दल तर कोणालाच शंका नव्हती. त्याची न्यायबुद्धी देवांना आणि मानवांना सारखीच मान्य होती. भावाला झालेल्या अन्यायाचा सूड त्यानें लवकरच उगवला आणि तो भारताचा स्वामी झाला. हें झाल्यावर त्यानें लढाया बंद करून टाकल्या आणि तो धर्मकार्यांत गढून गेला. त्यानें पशूंची हिंसा बंद केली व राज्यांत मांसाशन बंद केलें. ''दर पांच वर्षांनीं तो महामोक्षपरिषद भरवतो आणि आपला सारा द्रव्यकोश दानधर्मांत रिकामा करतो.'' या राजधानींतील भद्रविहारांत ह्युएनत्संग तीन महिने राहिला आणि तेथें वीर्यसेनाच्या हाताखालीं वर्णविभाषाव्याकरण याचा अभ्यास त्यानें केला.

अयोध्या इत्यादि ठिकाणीं जाऊन तो गंगेच्या कांठानें हयमुख राज्याकडे जाऊं लागला. वाटेंत त्याच्यावर एक मोठेंच संकट गुदरलें. चोरट्यांनीं ह्युएनत्संग व त्याच्याबरोबरचे लोक यांच्यावर अचानक घाला घातला आणि त्यांच्या अंगावरील रत्नें, मोतीं इत्यादि काढून घेण्यासाठीं त्यांनीं त्यांचीं वस्त्रेंही फेडून घेतलीं. हे चोरटे लोक दुर्गादेवीचे उपासक होते. दरवर्षी पावसाळ्यांत एक देखणें गोजिरवाणें माणूस बळी द्यावें, अशी त्यांची वहिवाट होती. ह्युएनत्संगलाच त्यांनीं बळी द्यावयाचें ठरविलें. त्यांनीं त्याला धरून बाजूला नेलें; एक दगडधोंड्यांचें स्थंडिल तयार केलें; आणि त्याला सांगितलें कीं, ''तुला आम्हीं बळी देणार आहों; तर तूं तयार हो.'' आपल्या या भारताच्या यात्रेचा शेवट असा होणार हें पाहून ह्युएनत्संग अतिशय कष्टी झाला. त्यानें त्या चोरट्यांचीं पुष्कळ आर्जवें

केली, परंतु ते मुळींच लक्ष देईनात. शेवटीं, त्यानें मन एकाग्र केलें आणि बुद्धाचा धांवा केला. त्याची समाधीही लागली. इतक्यांत एक मोठें प्रचंड वादळ सुरूं झालें, झाडें कडाकड् मोडून पडूं लागलीं आणि जिकडे तिकडे वाळूचीं कायधुळें उठलीं. चोरटे लोक घाबरून गेले. ह्युएनत्संगच्या बरोबरच्या लोकांनीं त्यांना सांगितलें कीं, हा सत्पुरुष चीनदेशांतून केवळ अभ्यासासाठीं येथें आला आहे. तुम्हीं त्याचा असा छळ करीत आहां; म्हणून देव तुमच्यावर रागावला आहे. मग त्यांना पश्चताप झाला आणि त्यांनीं बुद्धाचा धर्म स्वीकारला.

येथून पुढें हयमुखाला जाऊन तो प्रयाग क्षेत्रावर उतरला. या प्रयाग क्षेत्रावरच शिलादित्य राजा आपला पांच वर्षें शिल्लक राहिलेला द्रव्यकोश धर्मादाय करीत असे. सुमारें ५०० ली गेल्यावर तो कौसंबीला पोहोंचला. " येथें महा संघाराम असून जुन्या राजवाड्यांत एक मोठा विहार आहे. या विहारांत बुद्धाची एक चंदनाची मूर्ति आहे. या मूर्तीवर राजा उदतीयन यानें एक दगडी छत्री बांधलेली आहे. तेथून तीनशें ली गेलें म्हणजे विशाखा राज्यांत आपण जातों. येथें वीस संघाराम असून तीन हजार भिक्षु आहेत आणि हे सारे हीनयान पंथाचे आहेत. येथें जवळच सत्तर फूट उंचीचा एक वृक्ष आहे. दंतधावनासाठीं घेतलेल्या काटक्या धावन झाल्यावर बुद्धानें येथें फेंकून दिल्या. त्या भुईंत रूजल्या आणि त्यांचा हा प्रचंड वृक्ष झाला. पाखंडी लोकांनीं-म्हणजे आर्यधर्मीय लोकांनीं—तो कितीदां तरी तो तोडला, तरी तो पहिल्यासारखाच फोंफावत जातो आणि सदा हिरवागार राहतो, असें येथील लोक सांगतात. ईशान्येच्या बाजूला पांचशें ली गेल्यावर श्रावस्तीचें राज्य लागतें. त्याचा घेर सहा हजार ली असून, संघाराम आणि भिक्षू यांची तेथें एकच गर्दी आहे. जवळच एका जुन्या चौथऱ्याबर एक स्तूप बांधलेला आहे. याच चौथऱ्यावर पूर्वी राजा

प्रसेनजित यानें बुद्धाच्या प्रभोजनासाठीं एक सभागृह बांधलेलें होतें. पलीकडे एक बुरूज आहे. तेथें बुद्धाची थोरली मावशी प्रजापति भिक्षुणी हिचा विहार होता. पूर्वेच्या बाजूला कांहीं अंतरावर एक मोठी थोरली डोंगरांची चोळ आहे. देवदत्त यानें बुद्धाला विष घालण्याचा यत्न केला, तेव्हां तो याच घळींतून नरकांत जाऊन पडला. याच्या दक्षिणेला एक मोठा थोरला खड्डा आहे. कोकाली नांवाच्या भिक्षूनें बुद्धाची अतोनात निंदा केली तेव्हां याच खड्ड्यांत पडून तो नरकाला गेला. दक्षिणेच्या बाजूला कांहीं अंतरावर आणखी एक चोळ आहे. बुद्धाची निंदा केली, म्हणून याच चोळींतून एका ब्राम्हणीला नरकांत जावें लागलें.

" आग्नेयेकडे आठशें ली गेलें म्हणजे आपण कपिलवस्तु राज्यांत जातों. याच ठिकाणीं पूर्वीचा एक विहार आहे. येथें शाक्य बोधिसत्त्वानें आपल्या मातेच्या उदरांत सूक्ष्मरूपानें प्रवेश केला. वायव्येकडेही एक स्तूप आहे. त्या ठिकाणीं असित ऋषीनीं बुद्धाची पत्रिका लिहिली. कपिलवस्तु राजधानीच्या दोन्ही बाजूंना मोठीं पटांगणें आहेत. तेथेंच हा राजपुत्र मर्दानी खेळ खेळत असे. याच मैदानावरून घोड्यावर बसून प्रपंचाचा त्याग करून तो निघून गेला. तो म्हातारा माणूस, तो आजारी माणूस, तो मेलेला माणूस वगैरे त्याला जे भेटले, ते याच ठिकाणीं होत. "

येतां येता ह्युएनत्सँग वाराणसीला म्हणजे बनारस येथें आला. येथें त्याला तीस संघाराम दिसले आणि दोन हजार भिक्षूही भेटले. हीनयान पंथाच्या सर्वास्तिवादाचा अभ्यास येथें पुष्कळच चालत असे. येथून ह्युएनत्सँग मगध देशांत आला. " येथले लोक मोठे विद्वान् आणि सद्‌गुणी आहेत. संघाराम आणि भिक्षु यांची गर्दी आहे. सध्यां या राजधानीला पातलीपुत्र म्हणतात. पण पूर्वी याचें नांव कुसुमपुर असें होतें. बुद्धाचें निर्वाण झाल्यावर बिंबिसार राजाचा पणतु अशोक यानें आपली राजधानी

राजगृह नगरीहून येथें आणली. त्याला कित्येक पिढ्या होऊन गेल्या. आतां येथें कांहींही शिल्लक नाहीं."

येतां येतां ह्युएनत्सँग नालंद नगरीला आला. "हिंदुस्थान देशांत हजारोंच्या हजारों संघाराम आहेत; पण येथील संघाराम सर्वांत उंच आणि भव्य असा आहे आणि येथें दहा हजार भिक्षु वास्तव्य करतात. हे महायान पंथाचे ग्रंथ तर वाचतातच, पण वेद, हेतुविद्या, शब्दविद्या, चिकित्साविद्या, अथर्ववेद, सांख्यशास्त्र यांचाही अभ्यास करतात." आणखी कांहीं यात्रा करतां करतां ह्युएनत्सँग नालंद विद्यापीठाला परत आला. येथें त्यानें योगशास्त्राचीं तीन आवर्तनें ऐकलीं. न्यायानुसार या शास्त्राचें एक आवर्तन ऐकलें. हेतुविद्याशास्त्र, शब्दविद्या, प्राज्ञमूल-शास्त्रटीका, कोशविभाषा, षट्पदाभिधर्मशास्त्र इत्यादिकांचा अभ्यास त्यानें केला. ब्राह्मण ग्रंथांचाही व्यासंग त्यानें केला आणि व्याकरणाचेंही अवलोकन केलें. येथून पुढें तो हिरण्यदेशांत आला. "या देशांत जिकडे तिकडे दाट अरण्यें पसरलेलीं असून तेथें हत्तींचे मोठाले कळप हिंडत असतात."

येथून पुढें तो श्रीक्षेत्राला गेला. यांच्या पलीकडे कामलंका—म्हणजे पेगु—हा देश असून, त्याच्या पूर्वेस द्वारावति हा देश आहे. त्याच्याही पलीकडे ईशानपूर आहे. त्याच्यापलीकडे महाचंपा म्हणजे सयाम देश असून त्याच्या शेजारच्या देशाला यमराज देश असें म्हणतात. या देशांत ह्युएनत्सँग गेला नाहीं; पण तिकडील लोकांच्या चालीरीतींची माहिती मात्र त्यानें करून घेतली. पुढें त्याला कळलें कीं, सिंहल नांवाचा एक देश दक्षिणेला असून, योगशास्त्राचा अभ्यास केलेले विद्वान् लोक तेथें आहेत. माहीतगारांनीं सांगितलें कीं, समुद्रांतून जाणें बरें नव्हे. वाटेनें ओरिसा, कलिंग इत्यादि देश लागतील तिकडूनच जावें. ह्युएनत्सँग त्याच वाटेनें

निघाला. " दक्षिणेकडे वीस हजार ली गेलें म्हणजे सिंहल देश लागतो. तेथें बुद्धाच्या दातांवर एक मोठा स्तूप बांधलेला आहे. त्याच्या कळसावर एक झगझगीत हिरा बसविलेला आहे. आकाश निरभ्र असलें म्हणजे रात्रीच्या वेळीं या हिऱ्याचा उजेड एकाद्या ताऱ्याप्रमाणें पडतो. " कालिंग, कोसल इत्यादि देशांतून खालीं जातां जातां ह्युएनत्सँग आंध्र देशांत आला. वाटेंत एका विद्वान् ब्राह्मणाची गांठ पडली. त्याच्यापाशीं महिनाभर राहून, त्यानें एक अवघड ग्रंथ समजावून घेतला. इकडल्या या सगळ्या प्रदेशांत संघाराम आणि भिक्षू मुबलक आहेत असें त्याला दिसून आलें. दक्षिणे-कडील धनकटक राज्यांत तो आला. तेथें मूलाभिधर्माचा अभ्यास त्यानें केला. येथून तो द्रविड मुलखांत आला. " या देशाची राजधानी कांचिपूर ही आहे. हें कांचिपूर शहर दक्षिण सागराच्या कांठाशीं असून तेथून सिंहल देश तीन दिवसांच्या समुद्रवाटेवर आहे."

पुढें जावयाचें, पण इतक्यांत सिंहल देशचा राजा मरण पावला. देशांत दुष्काळ पडला, बंडाळी माजली आणि बोधिमेघेश्वर व अभयदंष्ट्र असे दोघे भिक्षू कांचिपूरास आले. त्यांच्याशीं चर्चा करतांना ह्युएनत्सँगला दिसून आलें कीं, योगशास्त्रांतील कांहीं कूटें यांनाही कळलेलीं नाहींत. " इकडेही अशोकाचे स्तूप आहेतच. शेवटीं समुद्रकांठीं मलयगिरी पर्वत आहे. या पर्वतावर पांढरा चंदन आहे. उन्हाळ्याच्या दिवसांत नाग याला विळखे घालून बसतात. इकडे कापराचींही झाडें आहेत."

" सिंहल देशांत पूर्वी बुद्ध धर्म नव्हता. तथागताचें निर्वाण झाल्यावर शंभर वर्षांनीं अशोकाचा धाकटा भाऊ महेन्द्र हा संन्यासी बनला आणि दोन श्रमणांना बरोबर घेऊन तो सिंहलांत आला. तेथें त्यानें अनेक अद्भुत चमत्कार केले आणि बुद्धाचीं तत्त्वें लोकांना शिकविलीं. लोक महायान पंथाचे असून येथें दहा हजार भिक्षू आहेत व शेकडों संघारामही

आहेत. राजवाड्याच्या शेजारींच बुद्धाच्या दातांचा विहार अस्मान उंच गेला आहे. याच्यावर एक पद्मराजरत्न झळकत असतें. रात्रींच्या वेळीं हें दहा हजार लीवरून दिसतें. या देशाच्या आग्नेयेच्या कोंपऱ्यांत लंकागिरी आहे. या देशाच्या खालीं हजार लीवर नारीकोर नांवाचें बेट आहे. येथलीं माणसें तीन फूट उंचीचीं असतात. त्यांचें बाकीचें अंग माणसासारखें असलें तरी, त्यांना पक्ष्यासारख्या चोंची असतात आणि ते केवळ नारळांवरच जगतात. ”

ह्युएनत्सँग सिंहल देशांत गेला नाहीं. तेथून तो परत उत्तरेकडे फिरला आणि येतां येतां, दोन अडीच हजार ली प्रवास झाल्यावर तो **महाराष्ट्र देशांत** येऊन ठेपला. “ येथले लोक मरण म्हणजे कःपदार्थ समजतात. ते सरळ वर्तनाचे मोठेच चाहते आहेत. राजा क्षत्रिय जातीचा असून, लढाऊ पेशाचा मोठा शोकी आहे. आपल्यापाशीं फार मोठें शस्त्रागार आहे असें याला वाटतें. पायदळ आणि घोडदळ यांची तयारी हा राजा फार काटेकोरपणें ठेवतो. युद्धनीतींतील नियम येथें सर्वांना चांगले समजतात आणि त्याचें पालनही होतें. एखाद्या सेनापतीला जर कोठें स्वारीवर धाडलें पण त्याचा पराभव झाला आणि त्याची सेना नष्ट झाली, तर राजा त्याला कसलाही देहदंड करीत नाहीं. फक्त तो त्याच्या अंगावरचीं सैनिकाचीं वस्त्रें काढून घेतो आणि त्याला लुगडें नेसवितो. अर्थात्‌च सेनापतीचें लाजून शेण होतें. ही शोभा चुकवण्यासाठीं सेनापति पुष्कळदा आत्महत्याही करतात. राजाच्या पदरीं कित्येक सहस्र शूर सैनिक आहेत आणि शेकडों रानटी हत्ती आहेत. यांना युद्धाच्या आधीं दारू पाजतात आणि एकदम शत्रूवर सोडून देतात. ते चालून येत आहेत असें पाहतांच शत्रू पळून गेले नाहींत असें कधीं होतच नाहीं. अर्थातच शेजारच्या सत्तालोलुप राजांना हा महाराष्ट्र देशाचा राजा कवडीचीही किंमत देत

नाहीं. एवढा शिलादित्य राजा की जो स्वतः मोठा कुशल सेनापति आणि ज्याचे सेनापतीही सदा यशस्वी, तो सुद्धां मोठ्या सरंजामानिशीं यश मिळवीनच अशा प्रतिज्ञेनें या राजावर चाल करून आला; परंतु याच्यापुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं. मग त्याला रथाला बांधून नेणें तर लांबच राहिलें. महाराष्ट्राच्या राजाचें नांव पुलकेशी असें आहे. महाराष्ट्राकडून उत्तरेकडे जाता जातां नर्मदा ओलांडली म्हणजे माळव प्रांतांत आपण पोहोंचतों. या देशांतील लोक मोठे सुसंस्कृत आणि भले आहेत. यांची कलाची आवड तर विशेषच आहे. मालव आणि मगध या दोन प्रांतांतील लोकानाच वाङ्मयाची खरी लज्जत आहे. हे मोठे संभाषणचतुर असून फार सभ्यपणानें बोलतात आणि भलेपणाला मान द्यावा हें त्यांना फार चांगलें कळतें.''

ब्राह्मणपूर, अतली, वल्लरी, इत्यादि देशांतून वायव्येकडे जाता जातां तो आनंदपुरला आला. तेथून पांचशें लीवर सौराष्ट्र लागतें. वायव्येकडे जाता जातां, तो शेवटीं मुलतानच्या आसपास आला. ''येथील लोक आदित्याची पूजा करतात.'' येथून ह्युएनत्सँग पुन्हा आग्नेयेकडे वळला आणि मगध देशांतील नालंद विद्यापीठांत आला. तेथें दोन महिने राहून तो यष्टि–वनांत गेला आणि जयसेन या एका क्षत्रिय गृहस्थाच्या घरीं जाऊन राहिला.

या जयसेनानें भद्र ऋषीच्या हाताखालीं अनेक शास्त्रांची सथा घेतली होती. मगध देशाचा राजा पूर्णवर्मा याच्या मनांत जयसेनाविषयीं अत्यंत आदरभाव वसत होता. पूर्णवर्म्यानें त्याला पुष्कळ आग्रह केला कीं, तुम्ही माझ्या राज्यांत रहावें. परंतु या विरक्त माणसानें राजानें देऊं केलेलें दान पत्करलें नाहीं आणि केवळ विद्याभ्यासासाठीं तो यष्टि–वनांत जाऊन राहिला. अशा या माणसाच्या संगतींत ह्युएनत्सँग याला पुष्कळच नवें

ज्ञान झालें हें काय सांगावयास हवें ? बुद्धाच्या धर्मग्रंथांत दिसत असलेले विरोध त्यानें या ठिकाणीं नीट समजावून घेतले आणि या ग्रंथाचा मेळ कसा घालतां येतो हें जयसेनाकडून त्यानें समजावून घेतलें. येथें कांहीं नास्तिकांशीं ह्युएनत्सँग याचा वाद झाला. वैशेषिकांशींही अनेक वाद झाले. त्याची विद्वत्ता पाहून हर्षभरित झालेला एक ब्राह्मण कामरूप देशांत म्हणजे आसामांत गेला आणि तेथील कुमारराजापाशीं त्यानें ह्युएनत्सँगची फारच स्तुती केली. कुमारराजानें ह्युएनत्सँगला एकदमच आमंत्रण धाडलें.

याच सुमाराला वज्र नांवाचा एक नग्न निर्ग्रंथी ह्युएनत्सँगच्याकडे आला. हे निर्ग्रंथी लोक ज्योतिष फार चांगलें जाणतात हें त्याला माहीत होतें. म्हणून तो याला म्हणाला, " माझी कुंडली मांड आणि पुढें काय आहे तें सांग." त्या निर्ग्रंथीनें भुईवर खडूनें त्याची कुंडली मांडली आणि तो म्हणाला, " तुम्हीं भारतांतच रहावें, हें फार चांगलें. जाऊन परत आलांत तरीही योग बरा दिसतो; पण त्यांतल्या त्यांत येथेंच राहणें हें जास्त बरें आहे. तुम्हाला अजून दहा वर्षे आयुष्य आहे. सध्यांची आपली सुस्थिती किती दिवस टिकेल हें ओळखण्यास कुंडलींत पुरेसें साधन नाहीं." ह्युएनत्सँगनें विचारलें, " मी जमा केलेल्या मूर्ति आणि पोथ्या या माझ्याबरोबर चीन देशांत सुखरूप जातील काय ?" निर्ग्रंथी म्हणाला " त्याची काळजी नको. योग असा दिसतो कीं, शिलादित्यराज आणि कुमारराज हे दोघे तुमच्याबरोबर आपलीं माणसें देतील आणि तुम्हीं कसलाही दगाफटका न होतां आपल्या देशांत सुखरूप पोहोंचाल." शिलादित्य आणि कुमार यांची पत्रापत्री होऊन, कान्यकुब्जाच्या म्हणजे कनोजच्या या शिलादित्य राजानें ठरविलें कीं, एक मोठी धर्मसभा भरवावी, महायान पंथाचें तत्त्वज्ञान या चिनी पंडिताकडून वदवावें, वाद

करावा आणि ह्युएनत्सँगनें अजिंक्यपत्र मिळविलें म्हणजे त्याचा मोठा मानसन्मान करावा. हा हेतू मनांत धरून शिलादित्य राजाची स्वारी सोन्याच्या नौबदी वाजवीत ह्युएनत्सँगकडे आली. पुढें होऊन शिलादित्यानें या चिनी पंडिताला प्रणाम केला आणि त्याला फुलें वाहिलीं. तो म्हणाला, " आपण महायान पंथावर जो ग्रंथ लिहिला आहे, तो फारच चांगला आहे. माझी इच्छा अशी आहे कीं, आमच्या कान्यकुब्ज शहरांत देशोदेशींचे श्रमण, ब्राह्मण आणि पाखंडी बोलवावे आणि त्यांच्या पुढें महायान पंथाचें तत्वज्ञान आपण सांगावें. अशा रीतीनें त्यांचा अहंकार नष्ट करावा व महायान पंथाचें वर्चस्व सिद्ध करावें." ह्युएनत्सँगनें हें पत्करलें.

लवकरच कान्यकुब्ज शहरांत अठरा देशचे राजे जमा झाले. महायान आणि हीनयान या पंथांचे तीन हजार शास्त्री; ब्राह्मण, निर्ग्रंथी मिळून तीन हजार; आणि नालंद विद्यापीठांतील तीन हजार असे शास्त्री-पंडित जमा झाले. कोणी हत्तीवरून आले; कोणी रथांतून आले; कोणी पालख्यांतून आले. हे सारे विद्वान्, बहुश्रुत, आणि वादकुशल असे व्यासंगी पंडित होते. शिलादित्यानें बुद्धाची सुवर्णमयी मूर्ति तयार केली होती. ती हत्तीच्या पाठीवर बसवून, वाजत गाजत, शिलादित्यानें सभास्थानाकडे आणिली. शिलादित्यराज आणि कुमारराज हे दोघे मूर्तीवर चवऱ्या ढाळीत होते. या हत्तीच्या मागें ह्युएनत्सँगचा हत्ती चाललेला होता आणि त्याच्या मागें देशोदेशींचे राजेरजवाडे पाठीवर घेऊन तीनशें हत्तींची रांग झुलत चालली होती. मंडपांत प्रवेश करतांच शिलादित्यानें बुद्धाची ती मूर्ति एका शोभिवंत सिंहासनावर बसविली आणि सर्व मंडळी स्थानापन्न झाली. जमलेल्या सहस्रावधि पंडितांपैकीं शेलक्या एक हजार पंडितांना त्यानें मंडपांत बसविलें. कांहीं कीर्तिवंत ब्राह्मण आणि पाखंडवादी लोक मिळून पांचशेंजणांना त्यानें आंतच जागा दिली. यानंतर ह्युएनत्सँगनें

आपला महायान पंथाचा सिद्धांत सांगितला आणि पंडितांना वादाला आव्हान केलें. तो म्हणाला, " मला जर कोणी वादांत जिंकलें, तर मी आपलें शीर कापून देईन. "

रात्र पडेपर्यंत सभा बसून राहिली, पण कोणीही पुढें आला नाहीं. हीनयान पंथाचे लोक हा चमत्कार बघतच राहिले. पांच दिवस हा प्रकार झाल्यावर ते चिडून गेले आणि त्यांनीं ह्युएनत्सँगला ठार मारण्याचा कट केला. ही बातमी राजाला कळतांच त्यानें घोषणा केली कीं, ह्युएनत्सँगच्या केसाला जर धक्का लागला, तर अपराध्याचें शीर उडेल आणि जर कोणी त्याला भलभलतें बोललें, तर त्याची जीभ कापून टाकूं. अठरा दिवस-पर्यंत ह्युएनत्सँगचें आव्हान कोणीही पत्करलें नाहीं. मग शिलादित्यानें घोषणा केली कीं, या चिनी पंडितानें अजिंक्यपत्र मिळविलें आहे. हीनयान पंथ चुकीचा ठरला आहे. यानंतर राजानें ह्युएनत्सँगच्यावर सोन्यारुप्याचा वर्षावच केला पण त्यानें एका पैशालाही बोट लावलें नाहीं.

पुढें ह्युएनत्सँगला घेऊन हे दोघे राजे प्रयागला आले आणि तेथें गंगायमुनांच्या तीरावर त्यांनीं प्रचंड दानयज्ञ केला. बुद्धाची मूर्ति बसवून भोंवतालच्या प्रदेशांतून जमलेल्या पांच लक्ष लोकांना त्यांनीं निरानिराळ्या तऱ्हेचीं दानें दिलीं. बुद्धभिक्षु, ब्राह्मण, पाखंडी असे सर्व लोक यांत होते. हा यज्ञ आटोपल्यावर, ' आतां मला स्वदेशांत गेलें पाहिजे ' असें ह्युएनत्सँगनें या राजांना सांगितलें.

तो नको, नको म्हणत असतांनासुद्धां त्यांनीं त्याच्याबरोबर पुष्कळच साहित्य दिलें आणि ह्युएनत्सँग प्रयागमधून बाहेर पडला. बरोबरच्या सर्व मूर्ति आणि पोथ्या त्यानें एका सेनाधिकाऱ्याच्या हवालीं केल्या. त्या घोड्यावर लादून, तो अधिकारी सिंधूकडे निघाला. तीन हजार मोहरा आणि दहा हजार रुपये वाटखर्चासाठीं देऊन उभय राजांनीं ह्युएनत्सँगची रवानगी केली.

## ह्युएनत्सँगचा प्रवास-मार्ग



**कौसांबीला** येऊन मुक्काम करीत करीत आणि अनेक देश ओलांडीत ह्युएनत्सँग **जालंदरला** आला. पुढें **तक्षशिलेला** जाऊन तो सिंधूवर येऊन दाखल झाला. या ठिकाणीं सिंधु नदी सहा ली रुंद आहे होती. पोथ्या, मूर्ति आणि बरोबरचीं माणसें एका नावेंत घालून ह्युएनत्सँग स्वतः हत्तीवर बसून नदींत शिरला. नाव मध्यावर येते तोंच जोराचा वारा सुटला आणि ती नाव उपडी झाली. सूत्रांच्या पन्नास पोथ्या आणि बरोबर आणलेलें नाना प्रकारचें फुलझाडांचें बीं बुडालें; पण माणूस मात्र कोणी दगावलें नाहीं. येथून पुढें ह्युएनत्सँग **काश्मीरांत** शिरला आणि कापिश राजाला बरोबर घेऊन **लंघन देशाच्या** समिवर आला. **आवाकान, सौकुट** इत्यादि देश पाठीमागें टाकून तो उत्तरेकडील बर्फाच्या प्रदेशांत शिरला. येथल्याइतके उंच पर्वत त्याला जंबुद्वीपांत कोठेंही भेटले नव्हते. येथून पुढें तो **हिमतल** देशांत गेला. **बदक् शॉन्, यॉंगान्, कुरान्** देशांतून पुढें जातां जातां तो **काशगर** प्रांतांत आला.

हजारों ली गेल्यावर तो **खोतान** प्रांतांत आला. या प्रांताचें नांव आपण मागें ऐकलेंच आहे. तेथून तो त्या पुराण्या **तुखारा** प्रांतांत आला. अनेक वळणें घेत घेत तो शेवटीं **चीन** देशाच्या सीमेला येऊन लागला. **शा चौ** येथें आल्यावर आपण आल्याची वर्दी त्यानें बादशहाकडे धाडली. बादशहा सध्यां **लोयांग** शहरीं होता. निरोप परत येतांच ह्युएनत्सँग जलदीनें पुढें गेला. त्याची आगमनाची वार्ता चोहोंकडे पसरली आणि ठिकठिकाणचे रस्ते दर्शनासाठीं उत्सुक असलेल्या लोकांनीं भरून जाऊं लागले. शेवटच्या टप्प्याला लोकांनीं त्याची मिरवणूक काढली आणि ह्युएनत्सँग वाजत गाजत राजधानींत प्रविष्ट झाला.

सहाशेंपंचेचाळीसच्या वसंत ऋतूंत ह्युएनत्सँग हा सिगान् फू या पश्चिम राजधानीच्या नगराला परत आला. दुसरे दिवशीं निरनिराळ्या मठपतींनीं

त्याची मोठी मिरवणूक काढली आणि 'शाश्वत-सुख' या नांवाच्या मठांत त्याला नेलें. या ठिकाणीं हिंदुस्थानांतून आणलेल्या नाना प्रकारच्या अमोलिक चिजा ह्युएनत्सँग यानें ठेवून दिल्या. या चिजा लक्षांत घेण्या-सारख्या आहेत. तथागताच्या शरीराचे बारीक बारीक दीडशें मांसकण, मगध राज्यांतील प्राग्बोध पर्वताच्या नाग गुहेंत बुद्धाची जी सावली त्यानें पाहिली होती, त्या सावलीप्रमाणें केलेला बुद्धाचा एक सोन्याचा पुतळा, कोसंबी देशाच्या राजानें काढविलेल्या चित्रावरून बनविलेली जी बुद्धाची चंदनमूर्ति होती तिच्यासारखीच तयार केलेली दुसरी एक चन्दनी मूर्ति, स्वर्गीय राजगृहांतून तथागत जेव्हां रत्नखचित शिडीवर उतरला, तेव्हांच्या त्याच्या बनवलेल्या मूर्तीची एक प्रतिकृति, मगध देशांत गृध्रकूट पर्वतावर बुद्ध हा सद्धर्म पुंडरीक इत्यादि सूत्रें सांगत आहे अशी एक केलेली त्याची चांदीची मूर्ति, नगरहार देशांत बुद्धानें आपली छाया शिल्लक ठेवली होती तिच्या बरहुकूम बनवलेली त्याची मूर्ति, वैशाली नगरींत बुद्ध धर्मतत्त्वाचा प्रसार करीत आहे असा एक चंदनाचा पुतळा व भारतांतून परत येतांना महायान पंथाचे बरोबर आणलेले अनेक ग्रंथ. यांत २२४ सूत्रें, १९२ शास्त्रें, स्थविर शाखेचे १५ ग्रंथ, महिशासक पंथाचे २२ ग्रंथ, सर्वास्तिवादी पंथाचे ६७ ग्रंथ, काश्यपीय पंथाचे १७, धर्मगुप्त पंथाचे ४२, हेतुवादशास्त्राच्या ३६ प्रति, शब्दविद्या-शास्त्राच्या १३ प्रति— हे सारे ग्रंथ त्यानें वीस घोड्यांवर लादून आणले होते. या वस्तू त्यानें वर सांगितलेल्या मठांत ठेवून दिल्या.

ह्युएनत्सँगनें पुढें संन्यासच घेतला आणि बरोबर आणलेल्या ग्रंथांचें भाषांतर करण्याचें काम त्यानें सुरू केलें. ६४८ च्या शेवटपर्यंत ५८ ग्रंथांचीं भाषांतरें त्यानें केलीं. सम्राटानें एका देवळांत त्याची सोय करून दिली. या ठिकाणीं ह्युएनत्सँगनें भाषांतराचें काम आमरण चालूं ठेवलें.

सुप्रभातीं उठावें, थोडा फलाहार करावा आणि चार तासपर्यंत धर्मग्रंथांचें विवरण लिहीत बसावें, पुढें शिष्यांना शिकवावें आणि देवळांतील कारभारांत कांहीं मन घालावें, असा त्याचा क्रम असे. शंभराहून जास्त विद्यार्थी त्याच्याकडे शिकावयास येत असत. चीन देशांतील आणि भारतांतील निरनिराळीं धर्ममतें तो या विद्यार्थ्यांना शिकवीत असे. ६५२ मध्यें या देवळाच्या दक्षिण दरवाज्यापाशीं, त्यानें एक पॅगोडा बांधविला व तेथेंच आपल्या जवळचे सर्व ग्रंथ आणि मूर्ति कायमच्या ठेवून दिल्या. हा पॅगोडा १८० फूट उंच असून, हिंदुस्थानांतील स्तूपांच्या पद्धतीनें बांधलेला होता. याला पांच मजले होते. सर्वांत वरच्या मजल्यावर एक स्वतंत्र खोली केलेली असून, आपल्या ग्रंथांना राजानें आणि राजपुत्रानें लिहिलेल्या प्रस्तावना त्यानें या खोलींत ठेवल्या होत्या.

६५४मध्यें मध्यभारतांतील महाबोधि देवालयांतून,त्याला भेटण्यासाठीं एक मंडळ आलें. या मंडळाला त्यानें सांगितलें कीं, सिंधु नदींतून अलीकडे येतांना, अमूक अमूक पोथ्या बुडाल्या आहेत; तर त्यांच्या दुसऱ्या प्रति पाठवून द्याव्या. भारतांतील पर्वत ओलांडतांना ह्युएनत्सँगला कांहीं थोडें दुखणें झालें होतें तें आतां बळावलें. राजवैद्यांनीं उपचार केल्यावर त्याला थोडें बरें वाटलें, पण आतां वार्धक्याची छाया त्याच्यावर पडूं लागली. ६६० सालीं महाप्रज्ञा-पारमिता या ग्रंथाच्या भाषांतराला त्यानें सुरवात केली. या ग्रंथाचे मूळचे दोन लक्ष श्लोक आहेत. यांचें साररूपानें भाषांतर करावें असें त्यानें ठरविलें. पण त्याला दृष्टांत झाला कीं, तूं असें करूं नकोस. मग हातीं असलेल्या या सूत्राच्या तीन निरनिराळ्या पोथ्यांची एकवाक्यता करून, त्यानें भाषांतरास सुरवात केली आणि ६६१ त भाषांतराचें काम पुरें केलें. महाप्रज्ञा पारमिता सूत्र या ग्रंथाचीं सहाशें प्रकरणें असून त्यांचे १०२ खंड केलेले आहेत. कोणीं कोणीं सुचविलें कीं, रत्नपूर सूत्राचेंही भाषांतर करावें. पण

तो म्हणाला कीं, " हें मला आतां झेपणार नाहीं. " आतांपर्यंत त्यानें ७४ ग्रंथांचीं भाषांतरें केलीं होतीं; आणि अनेक सूत्रांच्या प्रति स्वहस्तें केलेल्या होत्या. शेवटीं या सर्व ग्रंथांचें पारायण सुरू झालें. तें पुरें होतांच त्यानें डोळे मिटले आणि तो निश्चल पडून राहिला. थोड्या वेळानें मैत्रेय मुनीचीं स्तोत्रें त्यानें गायिलीं. त्याचा अंतकाळ आतां समीप आला होता. ६६४ च्या ऑक्टोबर महिन्याच्या १३ व्या तारखेस ह्युएनत्सँगचें देहावसान झालें. पश्चिमेकडील राजधानींतच त्याचा दफनविधि झाला. परंतु ६६९ त राजानें त्याचें शव तेथून हलविलें आणि फॉन् चून खोऱ्याच्या उत्तरेकडे एक मोठा पॅगोडा बांधून तेथेंच त्याची समाधि बांधली.

---

# डॉक्टर लिव्हिंग्स्टन्

लिव्हिंग्स्टन् या सुविख्यात प्रवाशाचा जन्म इ. स. १८१३ या वर्षी स्कॉटलंडमध्यें क्लाईड नदीच्या खोऱ्यांत ब्लँटायर येथें झाला. तो वाढूं लागला तसतसें दिसूं लागलें कीं, याचें कूळ आयबेरियन द्वीपकल्पाकडचें म्हणजे स्पेन देशांतलें असावें. हा पांच फूट सात इंच उंच होता. तरी भोंवतालचे लोक त्याला ठेंगणाच समजत असत. ‘ आमचा बुटका मिशनरी ’, ‘ आमचा निश्चयी छोटा मित्र, ’ अशीं त्याचीं वर्णनें झालेलीं आहेत. त्यावरून असें वाटतें कीं, स्कॉटलंडांतील इतर लोकांच्या मानानें लिव्हिंग्स्टन् बराच ठेंगणा असावा. याच्या बापाचा धंदा चहावाल्याचा होता. दहा वर्षांच्या वयाला डेव्हिड एका गिरणीमध्यें काम करूं लागला. सकाळीं सहा वाजल्यापासून रात्रीं आठ वाजेपर्यंत त्याला तेथें रखडावें लागे. पण याच वेळीं त्यानें मनाशीं निश्चय केला कीं, आपण शिकून शहाणे झालें पाहिजे; आणि या गिरणींतून बाहेर पडलें पाहिजे. हळूहळू त्यानें अनेक पुस्तकें जमविलीं आणि एकीकडे गिरणींतलें काम चालूं असतांना, दुसरीकडे वाचनाचें काम चालूं ठेवावें असें केलें.

डेव्हिडचें घराणें बालबोध आणि धार्मिक वळणाचें होतें. अर्थात् त्यालाही वाटूं लागलें कीं, वैद्यकाचा अभ्यास करावा आणि धर्मप्रसारकाचें

काम हातीं घ्यावें. सूतकताईचें काम करून जो कांहीं पैसा मिळे तो ग्लासगो येथील वैद्यकाच्या शाळेंत शुल्क म्हणजे फी म्हणून द्यावा आणि अभ्यास चालूं ठेवावा असा क्रम त्यानें चालूं केला. सगळ्या परीक्षांत त्यानें उत्तम यश मिळविलें आणि लवकरच लंडन–धर्मप्रसारक–समिति या संस्थेनें त्याला आपल्या पदरीं नोकर म्हणून ठेवलें व १८४० त केपटाऊन येथें त्याला धाडलें.

येथून पुढें एकोणीस वर्षें तो दक्षिण आफ्रिकेंत होता. येवढ्या काळांत त्याच्यावर अनेक संकटें आलीं, पण तो त्या सर्वांतून निभावून गेला. **बेचुआना लँड** या प्रांताच्या मध्यप्रदेशांत १८४२ च्या सुमाराला लिव्हिंग्स्टन्नें आपला मुक्काम कायम केला. याच सुमारास दक्षिणेच्या बाजूला फ्रेंच मिशनऱ्यांनीही आपला एक मठ घातलेला होता. हळूहळू त्यांचें काम उत्तरेच्या रोखानें पसरत चाललें होतें. पुढें जोडलेल्या नकाशांत पाहिलें म्हणजे दिसून येईल कीं, दक्षिण आफ्रिकेंतून उत्तरेकडे जाऊं लागलें म्हणजे, पूर्वेकडून पश्चिमेकडे वहात जाणारी **ऑरेंज** नांवाची नदी लागते. याही नदीच्या उत्तरेकडे गेल्यावर, **कोलोबेंग** या नांवाचें एक महत्त्वाचें ठिकाण आहे. याच्या उत्तरेला **कालाहारी** नांवाचें विस्तीर्ण वाळवंट आहे आणि हेंही ओलांडून उत्तरेकडे गेलें म्हणजे **गामी** नांवाचें एक सरोवर आहे. ऑरेंज नदी सोडली म्हणजे गामी सरोवरापर्यंत सारा मुलूख उजाडच आहे. एकदां गामी सरोवर लागलें म्हणजे तेथें, पाण्याची सुबत्ता आहे; चांगली वनश्री आहे; जमीन सुपीक आहे आणि अर्थातच तेथें माणसांची वस्तीही दाट आहे, असें वर्तमान इंग्रज व फ्रेंच या दोन्हीं जातींच्या मिशनऱ्यांनीं ऐकलेलें होतें. अर्थातच कालाहारी वाळवंट ओलांडून या गामी सरोवराच्या आसपास जाऊन तेथें आपलें काम सुरूं करावें, अशी तीव्र इच्छा फ्रेंच मिशनऱ्यांना झाली होती. लिव्हिंग्स्टन्ला

वाटूं लागलें कीं, फ्रेंच मिशनरी तेथें पोहोंचावयाच्या आधींच आपण तेथें जाऊन पोहोंचलें पाहिजे, म्हणून त्या टापूत राहणाऱ्या लोकांच्या संवयी, चालीरीती, भाषा आणि कायदेकानू यांचा अभ्यास त्यानें चालू केला.

इतक्यांत वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं त्याची बदली पश्चिम ट्रान्सवालकडे केली. तेथें मोफात कुटुंबाशीं त्याची ओळख झाली आणि १८४४ त मोफात याच्या सर्वांत वडील मुलीशीं त्याचें लग्न झालें. मेरीला बरोबर घेऊन लिव्हिंग्स्टन् ट्रान्सवाल देशांत बराच हिंडला. तेथें त्याची व बोअर लोकांची पुष्कळच ओळख झाली. हे बोअर लोक म्हणजे डच लोकांचेच वंशज होत. त्या देशांतील बेचुआना लोकाशीं हे फार उर्मटपणानें वागत; आणि शिवाय, ते असाही एक दावा सांगत कीं, ऑरेंज आणि वाल या दोन नद्यांच्या उत्तरेकडील प्रदेश हा आम्हां बोअर लोकांचा आहे; म्हणून इंग्रज लोकांनीं तिकडे फिरकतां कामा नये. बोअर लोकांचा हा दावा लिव्हिंग्स्टन्ला बिलकूल मान्य नव्हता. तो म्हणे कीं, " केपपासून कायरोपर्यंत म्हणजे दक्षिण टोकापासून तों उत्तर टोकांपर्यंतची सर्व आफ्रिका आम्हां इंग्रज लोकांचीच व्हावयाची आहे." ही ईर्षा त्याच्या मनांत उत्पन्न झाली होती खरी; पण हें काम अफाट होतें. केपटाऊनपासून ईजिप्तपर्यंतच्या मुलुखांत अनेक देशचे मिशनरी हिंडूं फिरूं लागले होते. मात्र आफ्रिकेच्या कांठाकांठाचा प्रदेश जरी पुष्कळांना माहीत झालेला होता तरी या खंडाच्या मध्यप्रदेशांत आजवर कोणीही गेलेलें नव्हतें. लिव्हिंग्स्टननें ठरविलें कीं, हा सर्व प्रदेश पायाखालीं घालणें हाच आपला जीवितहेतु असला पाहिजे.

हळूहळू त्याला उत्तरेकडील लोकांची भाषा येऊं लागली आणि तिकडील जमातींचे पुढारी त्याच्या ओळखीचे होऊं लागले. डॅक्केना जमातीचा पुढारी सेचेल हा त्याचा मित्र बनला; आणि लिव्हिंग्स्टनपाशीं

तो लिहावयास शिकला. या सेचेलनें लिव्हिंग्स्टन्च्या संगतींत दक्षिणेकडे केपटाऊन आणि उत्तरेकडे गामी सरोवर येथपर्यंत पायपिटी केली.

अगदीं आरंभालाच लिव्हिंगस्टन्ला आपल्या जीवितहेतूची कल्पना स्पष्ट झाली होती असें समजणें चुकीचें आहे. तथापि मध्य आफ्रिकेची ओढ त्याला आतां लागूं लागली होती, हें खरें आहे. त्याच दृष्टीनें त्याची तयारी चालू होती. इकडील प्रदेशांतील निग्रो लोकांच्या संबंधानें त्याचें फार चांगलें मत झालें होतें. कारण ओखेल नांवाच्या त्याच्या एका मिशनरी मित्रानें त्यांचा प्रामाणिकपणा आणि त्यांचें शौर्य या विषयींच्या अनेक कथा त्याला सांगितल्या होत्या. त्यांतली एक गोष्ट विशेष मनोरंजक म्हणून येथें देतों. कोलोबेंग या मकाणाच्या शेजारींच ही घडलेली होती.

नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें बायका शेतांवर कामें करीत होत्या आणि एक तरुण उमदा माणूस एका झाडाला टेकून त्यांच्याशीं बोलत उभा होता. एकाएकीं एका सिंहिणीनें त्याच्यावर झडप घातली आणि त्याला दांतांत धरून ती झपाट्यानें जाऊं लागली. इतक्यांत त्या बायकांपैकीं एक तरुण मुलगी वेगानें पुढें सरसावली आणि तिनें त्या सिंहिणीच्या शेंपटाला धरून तिला मागें ओढलें. अर्थातच तिची स्वतःची पुष्कळच फरफट निघाली. पण तोंडांत एक माणूस आणि मागें कोणी तरी शेपटी ओढीत असलेलें या अडचणीमुळें सिंहिणीचा वेग कमी झाला. इतक्यांत त्या पोरीनें ताडकन् सिंहिणीच्या पाठीवर उडी मारली आणि खांद्यावर असलेल्या फावड्याच्या टोंकानें सिंहिणीच्या डोक्यावर आणि नाकाडावर फडाफड ठोसरे मारले. शेवटीं सिंहिणीनें तोंडांतून त्या माणसाला टाकून दिलें. अर्थात् स्वार झालेल्या बाईनेंही खालीं उडी टाकली आणि सिंहीण झाडींत पळून गेली. तो तरुण उमदा माणूस त्या पोरीचा नवरा होता !

अशा या लोकांच्या संगतीचा उपयोग करून घ्यावा आणि मध्य आफ्रिकेचें संशोधन करावें असें लिव्हिंग्स्टन्च्या मनानें ठाम ठरलें. गामी सरोवर नेमकें कोठें आहे हें तद्देशीय लोकांना विचारून विचारून त्यानें नकाशांत कायम करून घेतलें. कालाहारी वाळवंट तुडवीत जाणें फार अवघड होतें. म्हणून वाळवंटाला वळसा घालून उत्तरेकडे जावें असें त्यानें ठरविलें. सेचैलला त्यानें सांगितलें कीं, " मला तुझी गाडी आणि तुझे कांहीं विश्वासू नोकर दे. मी त्यांना पगार देईन. पण त्यांनीं मला गामी सरोवराचा रस्ता दाखवला पाहिजे. तेथून परत येतांना. आम्हीं गाडीभर हस्तीदंत तुला आणून देऊं. तूं तो खुशाल वीक आणि त्याचा पैका कर. "

आपलीं मुलें—माणसें आणि केपटाऊन येथील विल्सन नांवाचा एक ओळखीचा व्यापारी बरोबर घेऊन लिव्हिंग्स्टन् गामी सरोवराच्या शोधासाठीं निघाला. प्रत्येक गाडीच्या चाकाला फेरे मोजण्याचें एक यंत्र त्यानें बांधलें. चाकांचे परीघ अर्थात्च ठरलेले होते. त्यांना फेऱ्यांनीं गुणलें म्हणजे किती मैल चालून झालें हें कळण्याची सोय अशा रीतीनें झाली. १८९९ च्या मे महिन्यांत कोलोबेन गांव त्यानें सोडलें आणि उत्तर बेचुआना लँड या प्रदेशांत ते शिरले येथें त्यांचे खाण्यापिण्याचे फार हाल झाले. मांस मिळत नाहीं म्हणून त्याचीं पोरें रडूं लागलीं. पण त्यांची समजूत घालण्यासाठीं भोंवतालच्या दयाळू रानटी लोकांनीं त्यांना एक एक सुरवंट खावयास दिला. हे सुरवंट भले मोठे असून, " फार गोड लागत आहेत " असा पोरांचा अभिप्राय पडला ! बेचुआना लोक तर हे सुरवंट गबागबा खात असत. सुरवंट नकोसे झाले, तर त्यांची जागा टोळांनीं भरून काढण्यांत येई. लिव्हिंग्स्टन् वगैरे मंडळी म्हणत कीं, कसल्या तरी छानदार भाजसिारखे हे लागतात. शिजवून चांगले कुटले आणि मध

घालून कालवले म्हणजे यांची रुचि अलौकिक लागते, असा लिव्हिंग्स्टन्-चाही अभिप्राय पडला. या दोहोंनीही भागेना तर, मोठमोठाले बेडूक तेथें सांपडत असत. त्यांची चटक तर लहान मुलांस फारच लागली. **कालाहारी** वाळवंटाचा ईशान्य टापू अगदींच वैराण आहे. बरोबरचे बैल व इतर गुरें अगदीं घोपून गेलीं आणि ते अवजड गाडे ओढण्याचें काम त्यांच्याच्यानें नीट होईना. दोन दोन दिवस गेले तरी, पाण्याचा एक टिपूस सांपडत नसे. साधारण ओलावा दिसला म्हणजे खोल खणावें, आणि तासन्तास वाट पहावी, तेव्हां एक कुळचाभर पाणी कसेंतरी झिरपलेलें सांपडे. माणसेंच तेवढें पिऊन जात; आणि तान्हेलेलीं गुरें नुसत्या धांपा टाकीत पुढें जात. होतां होतां कालाहारीचें पठार संपलें आणि यांचे गाडे जलदीनें उतरूं लागून **मोफ्कोको** नदीच्या पात्रांत उतरले.

पण ही **मोकोको** नदी अगदीं खडखडीत वाळून गेली होती. सुदैवानें एक पावसाची सर आली; आणि वरून पडलेल्या पाण्याला भेटावयास रेतीच्या खालचें पाणी उचंबळून वर आलें. माणसें आणि गुरें पोट भरभरून पाणी प्यालीं.

लिव्हिंग्स्टन् याला भूपृष्ठाचें निरीक्षण कसें करावें, हें चांगलें कळत होतें. त्यानें अंदाज केला कीं, या टापूंत पूर्वी एक फार विस्तीर्ण सरोवर असावें. सध्यांचें गामी सरोवर म्हणजे त्याचा राहिलेला एक अवशेष असावा. एका रानटी बाईनें त्यांना वाट दाखवण्याचें काम पत्करलें. आठ मैल रखडत गेल्यानंतर ते एका झऱ्यापाशीं जाऊन पोहोंचले. बक्षीस म्हणून लिव्हिंग्स्टन्नें या बाईला एक मांसाचा लहानसा तुकडा दिला आणि कांचेच्या मण्याचा एक झुबकाही दिला. ही देणगी पाहून ती बाई आपलें सबंध तोंड उघडून मोठमोठ्यानें हसूं लागली. तिच्या संगतींत पुढें जातां जातां त्यांना एक फार मोठें सरोवर दिसलें. तें पाहतांच लिव्हिंग्स्टन्च्या

मित्रानें हर्षभरित होऊन आपल्या डोक्याची टोपी हवेंत फेंकली; पण त्या दोघांही मित्रांना थोडक्याच वेळांत कळून आलें कीं, या साऱ्या मृगजळाच्या लाटा असाव्यात.

घोडीं, कुत्रीं, बैल आणि बरोबर आलेले हॉटेन्टॉट् लोक या सर्वांना असें वाटलें कीं, हें एक सुंदर सरोवर असावें! पण हा आभास एकदम दूर झाला आणि उन्हाच्या झळांनीं उठलेल्या हवेच्या लाटाच आपण पहात होतों असें सर्वांना कळून आलें.

१८४९ जुलै ४ रोजीं लिव्हिंग्स्टन् आपल्या बरोबरच्या मंडळींसह झुगा नदीच्या तीरावर येऊन पोहोंचला. ही नदी गामी सरोवरांत उगम पावून ईशान्येच्या बाजूनें वहात जातां जातां शेवटीं वाळवंटें आणि दलदली यांत गडप होऊन गेली आहे. या नदीवर पोहोंचल्याबरोबर, लिव्हिंग्स्टन्च्या ध्यानीं आलें कीं, हिच्या कांठानें पश्चिमेकडे गेलें तर आपण शेवटीं गामी सरोवरावर जाऊन पोहोंचूं. मात्र मधलें अंतर सुमारें पावणेतीनशें मैलांचें असून सावजें पकडण्यासाठीं, रानटी लोकांनीं ठिकठिकाणीं खणलेले मोठाले खड्डे केव्हां दगा देतील याचाही नेम नव्हता. तथापि, तिकडून जाणें भागच होतें. नदीच्या कांठची वनश्री अतिशय सुंदर होती. ताडामाडाचीं झाडें, फुलझाडें, वडाचीं झाडें यांच्या राया सगळीकडे लागलेल्या होत्या आणि राक्षसी आकाराचे मोआना किंवा बाओबाब नांवाचे वृक्ष मधून मधून उंच माना करून उभे होते. हे आडदांड आणि दांडगे वृक्ष बघून कोणालाही भयच वाटावें असें होतें. भुईपासून चार फूट अंतरावर त्यांच्या बुंध्यांचा घेर मोजला, तो पंचाहत्तर फूट भरला. हळूहळू ते गामी सरोवराच्या जवळ येऊं लागले, तों तेथें तामुनाकल आणि झुगा यांचा संगम झालेला त्यांना दिसला. संगमाची शोभा पहात असतांना

लिव्हिंग्स्टन्नें तद्देशीय माणसांना विचारलें, " ही तुमची तामुनाकल नदी उत्तरेकडून कोठून येत आहे ? " ते रानटी लोक जरी आपल्या घरापासून फारसे दूर फिरकलेले नसले, तरी त्यांना थोडीशी ऐकीव माहिती होती. ते उत्तरेच्या बाजूला हात करून म्हणाले, " तिकडे दूर मोठा सुंदर प्रदेश आहे. तिकडे नद्याच नद्या वहात आहेत; आणि त्यांच्या कांठीं किर्र्र् झाडी लागली आहे. " हें त्यांचें उत्तर ऐकतांच लिव्हिंगस्टनच्या डोक्यांत एकदम निराळाच प्रकाश पडला. ते लोक हातानें दर्शवीत होते तो प्रदेश म्हणजे मध्य आफ्रिका होय. आतांपर्यंत तोतया माहीतगारांनीं युरोपांतील लोकांचा असा समज करून दिला होता कीं, उत्तर आफ्रिकेंत जसें साहाराचें प्रचंड वाळवंट आहे तसें मध्य आफ्रिकेंतही एक आहे. पण या रानटांच्या उद्गारांवरून लिव्हिंग्स्टन्ला असें चक्क दिसूं लागलें कीं, मध्य आफ्रिकेंत वाळवंट तर नाहींच नाहीं; पण ती लहानमोठ्या नद्यांनीं सुपीक झालेली आणि वृक्षराजींनीं सुशोभित बनलेली एक भूमि आहे. आतांपर्यंत त्याला गामी सरोवरापर्यंत जावें येवढेंच वाटत होतें; पण आतां त्याची आकांक्षा दुणावली. आज ना उद्यां केव्हां तरी मध्य आफ्रिकेच्या सजल आणि सुफल प्रदेशांत आपण जाऊन यावें असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें.

पुढें जातां जातां ऑगस्टच्या १ ल्या तारखेला गामी सरोवराच्या ईशान्य तीरावर हे सर्व लोक जाऊन पोहोंचले. कालाहारी वाळवंटाच्या दक्षिणेकडून निघाल्यापासून जलानें आणि वनराजीनें प्रसन्न असा देखावा त्यांनीं आतांपर्यंत पाहिलाच नव्हता. गामीच्या तीरावर उभें राहून त्यांनीं तो सुंदर देखावा पोटभर पाहिला. लिव्हिंग्स्टन्चें पाहणें अर्थातच थोडेसें शास्त्रीय पद्धतीचें होतें. मागें राहिलेल्या पठारावरून आतां ते दोन हजार फूट खालीं आलेले होते. प्रदेश सखल असल्यामुळें पावसाचें पाणी सांचून सांचून येवढें सरोवर झालें असावें असा कयास त्यानें केला.

गामी सरोवरावर येण्यांत लिव्हिंग्स्टन्चा असा हेतू होता कीं, उत्तरेकडच्या नद्यांच्या कांठानें थोडेसें वर जावें आणि बेचुआना लोकांची जी मोकोलोलो नांवाची जमात होती, तिचा म्होरक्या सेबितानी याला जाऊन भेटावें. पण तसें जावयाचें म्हणजे एकादी नाव जवळ असावयास हवी होती. ती आणण्यासाठीं लिव्हिंग्स्टन्नें आपला मित्र ओस्वेल याला केप टाऊनकडे परत धाडलें आणि मुलें–माणसें घेऊन तो कोलोबेंगकडे खालीं उतरला. येतांना त्याला भेटलेले नाना प्रकारचे पशु केवळ भयंकर या शब्दानेंच वर्णिले पाहिजेत. हत्तींचे कळप जिकडे तिकडे हिंडत होते. ठिकठिकाणीं भेटणारे तलाव माशांनीं आणि सुसरींनीं भरून गेलेले दिसले.

कोलोबेंग येथें आल्यावर लिव्हिंग्स्टन्ला वाटूं लागलें कीं, नावेची वाट पहात बसण्यांत मतलब नाहीं. झुगा नदीला उतार कोठें आहे तें हुडकून काढावें आणि बरोबरचे गाडे नदींत घालून पलीकडे जावें. तेथून उत्तरेकडे दोनशें मैल गेलें म्हणजे सेबितानी भेटेल असा त्याचा अंदाज होता. लिव्हिंग्स्टन् याप्रमाणें उत्तरेकडे जावयास निघालाही. पण त्याचा हा बेत अगदीं फसला. झुगाकडे तो जाऊं लागला तों त्याचे लोक भराभर आजारी पडूं लागले आणि त्सित्सि माशांनीं चावून चावून त्यांच्या अंगांची चाळण केली. लिव्हिंग्स्टन्चीं पोरें तर तापानें निपचितच पडलीं. परत मुक्कामाला येऊन त्यानें थोडी विश्रांति घेतली आणि पुढील वसंतांत परत आलेल्या ओस्वेलला बरोबर घेऊन लिव्हिंग्स्टन् मंडळी पुन्हां उत्तरेला निघाली.

सेबितानी याला कळलें होतें कीं, कांहीं गोरे लोक आपल्या भेटीला येऊं इच्छितात. पण दरम्यानच्या प्रदेशांतील रानटी लोक त्याला येऊं देतील असें दिसेना. कारण, जर या गोऱ्या लोकांना उत्तरेकडील झांबेझी नदीकडे जाऊं दिलें, तर त्या प्रदेशांतील हस्तिदंताची सारी

दौलत ते लुटून नेतील अशी भीति त्यांना वाटत असे. पण सेबितानी यानें या लोकांना कांहीं अवदान चारलें आणि मग ते लिव्हिंग्स्टन्ला आपल्या प्रदेशांतून जाऊं द्यावयास तयार झाले.

सेबितानीच्या शिफारसीचा उपयोग लिव्हिंग्स्टन्ला जसा झाला, तसाच त्याच्या स्वतःच्या अंगच्या एका कसबाचाही झाला. जुन्या बंदुका साफ करण्याचें आणि दुरुस्त करण्याचें कसब लिव्हिंग्स्टन्ला साधलेलें असें. या रानटी लोकांपाशीं कोठें कोठें एखादी बंदूक असे, पण ती गंजून गेलेली असे. ती साफ करून देतांच हे भाबडे लोक आनंदून जात आणि लिव्हिंग्स्टन्ला वाट दाखवण्यासाठीं त्याच्याबरोबर जात. होतां होतां ते **चोबी नदी**वर जाऊन पोहोंचले. तेथें सेबितानीच्या लोकांची आणि त्यांची गांठ पडली. या लोकांनीं या गोऱ्या लोकांना थेट आपल्या धन्याकडे नेलें.

मोकोलोलो जमातीचा नायक गाण्याच्या मैफलींत बसला होता. गोरे पाहुणे आल्याचें कळतांच तो त्यांना सामोरा आला. सेबितानी थोडा भिडस्त दिसला. या पाहुण्यांना पाहून तो थोडासा दबल्यासारखा झाला. "आम्हीं आपल्या इंग्रजी पद्धतीप्रमाणें एकदम हात पुढें केले आणि नवलाची गोष्ट अशी कीं, आतां काय करावयाचें हें चटकन् उमगून त्यानें आपला हात आमच्या हातांत दिला." वास्तविक पाहतां, गोऱ्या लोकांशीं हस्तांदोलन करावें लागतें हें त्याला माहित नव्हतें. परंतु उपजत बुद्धीनेंच हातांत हात घालावा हें त्याला सुचलें.

हा सेबितानी मोठा शूर लढवय्या होता. त्याच्या भोंवतीं त्याच्या लोकांचा गराडा उभा होता. दोन साधेसुधे इंग्रज लोक त्याच्या समोर उभे होते; पण त्यांना पाहूनसुद्धां हा रणशूर माणूस थोडासा बावरल्यासारखा झाला. सेबितानी सुमारें पंचेचाळीस वर्षांचा असावा. त्याच्या शरीराची काठी उंच असून, बांधा पिळदार होता. त्याची अंगकांति फिकट, पांढुरकी होती.

त्याच्या डोक्याला थोडेसें टक्कल पडलें होतें. त्याच्या वागणुकींत एक तऱ्हेचा शांतपणा आणि धिमेपणा दिसत होता. त्याच्या शौर्याच्या किती तरी कथा गोऱ्या लोकांनीं ऐकलेल्या होत्या. शत्रू चाल करून येत आहे असें पाहिलें म्हणजे आपल्या फरशी कुऱ्हाडीची धार तो बोटांनीं पाही आणि म्हणे, "वा! धार तर नामी लागली आहे. जो कोणी आतां शत्रूकडे पाठ फिरवील, त्याच्या पाठींत ही बसली म्हणून समजावें." सेबितानी अतिशय चपळ होता. रणांगणावरून जर कोणी त्याचे अनुयायी पळून जाऊं लागले तर धांवत जाऊन हा त्यांना गांठी आणि त्यांचे तुकडे करून टाकी. कोणी इकडे तिकडे दडून बसले असले तर तो त्यांना घरीं जाऊं देई आणि लढाई जुंपल्यावर त्यांना बोलावून आणून म्हणे कीं, "मैदानांत मरण्यापेक्षां घरांत मरणें तुम्हांला पसंत पडतें काय? पडत असेल, तर हें घ्या मरण!" असें म्हणून तो त्यांना एकदम कापून टाकी.

असा हा निर्भय म्होरक्या खरा; युरोपियन लोकांची गांठ पडावी असें त्याला वाटत असें हेंही खरें; पण त्यांची गांठ प्रत्यक्ष पडल्यानंतर त्याला कसेंसें वाटूं लागलें आणि कदाचित् हे येऊन पोहोंचल्यानें आपल्या देशाचें काय होईल, असा विकल्पही त्याच्या मनांत आला असावा. पाहुण्यांच्या स्वागतासाठीं त्यानें एक मोठा बैल मारला आणि थाटाची मेजवानी केली. सेबितानी आपल्या जमातीच्या लोकांत अतिशय प्रिय होता. माणसांचा संग्रह करण्याच्या कामीं तर त्याच्या जोडीचा माणूसच सांपडला नसता. मेजवानी आटोपल्यावर निजानीज झाली आणि मग मध्यरात्रीच्या सुमाराला सेबितानी एकटाच या पाहुण्यांच्याकडे आला. शेकोटीशेजारीं बसून आपला सर्व इतिहास त्यानें या गोऱ्या लोकांना सांगितला. मधून मधून लिव्हिंग्स्टन् एखादा प्रश्न विचारी आणि सेबितानी मोठ्या सौम्य वाणीनें त्याचीं उत्तरें देई. उत्तरेकडील प्रदेशाचा ताबा

आपण कसा मिळवला याचें मोठें सुरस वर्णन सेबितानी यानें केलें. झांबेझी नदीच्या कांठानें जातां जातां गोऱ्या लोकांनीं वस्ती केलेल्या प्रदेशांत जावें आणि थोड्याशा बंदुका हस्तगत करून आपल्या मुलुखांत सुखानें रहावें असाही त्याचा बेत होता. पण हें जमेना म्हणून त्यानें दक्षिणेकडे लिव्हिंग्स्टन्ला बोलावणें पाठविलें होतें.

परंतु गोऱ्या लोकांची मैत्री जोडण्याचा सेबितानी याचा हेतु शेवटीं सफल झाला नाहीं. त्याला झालेली एक जखम चरत चालली आणि त्याच्या फुफ्फुसांत सूज येऊं लागली. लिव्हिंग्स्टन्च्या भेटीनंतर लवकरच तो फार आजारी पडला आणि थोड्याच दिवसांत मरून गेला. शेवटपर्यंत लिव्हिंग्स्टन् आणि त्याचीं मुलेंबाळें यांच्या संबंधानेंच तो बोलत होता. त्यानें आपल्या एका बायकोला निरोप धाडला कीं, रॉबर्टला—म्हणजे लिव्हिंग्स्टन्च्या मुलाला—प्यायला दूध आणून द्या. यानंतर पुन्हां त्याच्या तोंडांतून शब्दच आला नाहीं.

सेबितानीच्या मृत्यूमुळें आपले बेत आतां फसतील कीं काय, असें लिव्हिंग्स्टन्ला वाटूं लागलें. सेबितानीच्या मागून राज्याचा वारसा त्याच्या मुलीकडे जाणार होता. त्याच्या मृत्यूच्या वेळीं ही पोरगी दहाबारा दिवसांच्या मुक्कामावर उत्तरेकडे होती. बापाच्या मृत्यूचें वर्तमान ऐकल्यावर तिनें लिव्हिंग्स्टन्ला निरोप धाडला कीं, तुमचें संशोधनाचें काम चालूं ठेवावयास माझी कांहींच हरकत नाहीं. मुलेंमाणसें चोबी नदीच्या कांठावरील शिबिरांत ठेवून व ओस्वेलला मात्र बरोबर घेऊन लिव्हिंग्स्टन् ईशान्येच्या रोखानें घोड्यावरून निघाला.

पंधरा वीस मैल दलदलींतून आणि उंच उंच गवतांतून प्रवास केल्या-नंतर, १८५१ ऑगस्टच्या ४ तारखेला ते सिषेकी नदीच्या तीरावर येऊन पोहोंचले. ही सिषेकी म्हणजेच मध्य आफ्रिकेंतून वाहणारी झांबेझी

नदी होय. नदीचें तें सुंदर पात्र पाहून लिव्हिंग्स्टन् आणि ओस्वेल हर्षभरित होऊन गेले. सुमारें पाव मैल रुंदीचा तो पाण्याचा प्रचंड प्रवाह गंभीरपणें खळाळत असलेला पाहून हे दोघे इंग्रज कांहीं वेळपर्यंत केवळ स्तंभित होऊन गेले. नदीच्या कांठांवर पांढरी शुभ्र वाळू पसरलेली असून त्यांवर सुसरी येऊन बसल्या होत्या आणि नदीच्या पात्रांत मोठमोठाले पाणघोडे दिसत होते. ही नदी ओलांडून त्यांना पलीकडे जावयाचें होतें. तेथील रानटांनीं एक होडगें आणलें. मग त्यांतून जात असतांना सृष्टिसौंदर्याचा आणि परमेश्वराच्या कृतीचा तो भव्य देखावा पाहून लिव्हिंग्स्टन् गहिंवरून गेला आणि देवानें हा देखावा आपल्याला दाखविला म्हणून कृतज्ञताबुद्धीनें आणि श्रद्धायुक्त मनानें त्यानें देवाची प्रार्थना केली. त्याच्या डोळ्यांत कृतज्ञतेचे अश्रूही आले असते, पण ते आले तर हा गोरा पाहुणा नदीच्या पात्राला सुसरींना आणि पाणघोड्यांना भीत आहे असें त्या रानटांना वाटलें असतें! पलीकडल्या कांठांवर सिपेकी नांवाचें गांव होतें. तेथील लोकांनीं या पाहुण्यांचें मनापासून स्वागत केलें.

त्या गांवच्या लोकांना इतका आनंद अशासाठीं झाला कीं, आतां हे गोरे लोक आले आहेत तर आपल्याला ते थोड्याशा बंदुका देतील आणि मग आपल्यावर वेळीं अवेळीं चाल करून येणाऱ्या भोंवतालच्या रानटी लोकांना आपण गोळ्या घालून ठार मारूं आणि सुखानें झोंप घेऊं असें त्यांना वाटूं लागलें होतें. इकडे लिव्हिंग्स्टन्चा आनंद तर पोटांत मावत नव्हता. कारण, मध्य आफ्रिकेंतील एक फार प्रचंड नदी आपण पहिल्यानें शोधून काढली असें त्याला वाटत होतें. मुलांमाणसांना बोलवून आणावें, झांबेझी नदीच्या कांठीं कांहीं दिवस मुक्काम करावा व तोपर्यंत ओस्वेल यानें नदीच्या कांठाकांठानें जाऊन समुद्रापर्यंत तिचा प्रवाह पारखून यावें असें पहिल्यानें त्याला वाटलें. पण तिकडील मुलूख

सारा दलदलीनें भरलेला आहे हें कळल्यावर त्यानें हा बेत रद्द केला आणि लिव्हिंग्स्टन्बाई ज्या शिबिरांत राहिल्या होत्या तिकडे ते परत वळले. दरम्यान लिव्हिंग्स्टन्बाई प्रसूत झाल्या. झुगा नदीकडे ही मंडळी लवकरच परत आली. त्यांनीं असें ठरविलें कीं, लिव्हिंग्स्टन्चीं बायकामुलें घेऊन ओस्वेलनें इंग्लंडला परत जावें आणि लिव्हिंग्स्टन्नें **केपटाऊन** येथें राहून अक्षांश–रेखांशांचें ज्ञान संपादन करावें आणि परत उत्तरेकडे जाऊन झांबेझी नदीचें संशोधन पुरें करावें. हा बेत निश्चित होऊन सर्व मंडळी केपटाऊनकडे परत आली.

**केपटाऊन** येथें लिव्हिंग्स्टन् हा सुमारें महिनाभर राहिला. तेवढ्यांत त्यानें आपला अक्षांश–रेखांशांचा अभ्यास पुरा केला. १८५२ च्या जून महिन्याच्या आरंभीं झांबेझी नदीचें संशोधन पुरें करण्यासाठीं लिव्हिंग्स्टन् पुन्हां उत्तरेकडे निघाला. एक मोठी थोरली अवजड गाडी त्यानें सामानानें लादली. ही ओढावयास दहा बैल लागत असत. ख्रिस्ती झालेले दोन बेचुआना लोक त्यानें बरोबर घेतले आणि सगळेजण त्या गाडींत बसून उत्तरेच्या वाटेला लागले. लिव्हिंग्स्टन् एकदां म्हणाला, "बैलगाडींत बसून प्रवास करणें म्हणजे वनभोजनाला गेल्यासारखें वाटतें. बैलगाडीचा प्रवास प्रकृतीला फारच मानवतो. जे लोक फाजील चिकित्सा-खोर आहेत आणि हें नको तें नको असें मानण्यांत भूषण मानतात, त्यांची गोष्ट निराळी; पण ज्यांना मोकळ्या हवेंत प्रवास करावयाचा असेल त्यांना बैलगाडीसारखें सुख नाहीं." नोव्हेंबर २० ला लिव्हिंग्स्टन् **कोलोबेन** येथें पोहोंचला. १८५३ च्या मे महिन्यांत **चोबी नदीच्या** तळावर जाऊन तो पोहोंचला.

सांगडीवर बसून तो **चोबी नदीच्या** पलीकडल्या तीरावर **लिनयानती** या गांवाकडे गेला. मोकोलोलो लोकांचें हें राजधानीचें ठिकाण होतें.

त्याच्याकडे पाहून तद्देशीय लोकांना वाटलें कीं, हा माणूस बहुधा आकाशांतून उतरला असावा. नदी उतरून कोणी आपल्या देशांत येईल असें या लोकांना कधीं वाटतच नसे. म्हणून ते म्हणूं लागले कीं, हा आभाळांतून उतरला असावा. या लिन्यान्ती राजधानींत सेबितानीचा मुलगा सीकेलेतू हा राज्य करीत होता. त्यानें लिव्हिंग्स्टन्चें चांगलें स्वागत केलें आणि त्याच्या दरबारांतील भालदार–चोपदारांनीं, शिंगाड्यांनीं आणि नाना तऱ्हेच्या ललकारण्यांनीं तो सारा प्रदेश दणाणून सोडला. हे लोक म्हणूं लागले कीं, आतां आम्हांला स्वस्थपणानें झोंप येईल. कारण, शत्रूंना मारावयास या पाहुण्याकडून बंदुका मिळतील असें त्यांना वाटूं लागलें.

या ठिकाणीं एक लहानशी आडकथा सांगितली पाहिजे. पोर्तुगीज लोकांनीं गुलामांचा व्यापार जोरांत चालूं केला होता. आफ्रिकेंतील माणसें धरावीं आणि तीं दुसरीकडे कोठें तरी नेऊन विकावीं हा त्यांनीं मोठा कमाईचा धंदा बनविला होता. या धंद्यांत पोर्तुगीज व्यापाऱ्यांनीं आफ्रिकें-तीलच कांहीं लोकांना सामील करून घेतलें होतें. यांच्यांतीलच चार गुंड टगे गाठले, त्यांना दोन बंदुका देऊं केल्या, म्हणजे आसपासचीं वाटेल तितकीं माणसें हे धरून आणून देतील हें या व्यापाऱ्यांनीं ओळखलें. आणि मग त्यांच्या सहाय्यानें तिकडील लोकांना धरण्याचा आणि समुद्र-कांठीं आणून विकण्याचा उघड उघड धंदा या पोर्तुगीजांनीं सुरूं केला. चार दोन बंदुकांसाठीं आपल्याच लोकांना धरून गुलाम म्हणून तिसऱ्यांच्या हवालीं करावें याची या लोकांना दिक्कतच वाटत नसे. ज्या मोकोलोलो लोकांत लिव्हिंग्स्टन् जाऊन उतरला होता त्यांचाही हाच धंदा होता. त्यामुळें पूर्व आफ्रिका आणि पश्चिम आफ्रिका यांचा संबंध या लोकांच्या द्वारांच जोडून गेला होता. ते पूर्व–पश्चिम सारखे हिंडत असल्यामुळें त्यांना मध्य-

आफ्रिकेची माहिती चांगलीच झालेली होती. त्यांच्या या माहितीच्या बळावरच या प्रदेशाचें संशोधन लिव्हिंग्स्टन्नें करून दाखविलें.

लिव्हिंग्स्टन् याला आतां **झांबेझीकडे** जावयाचें होतें. तिकडे जावयाचें म्हणजे बैलावर स्वार होऊन जाणें सोयीचें होतें. मोकोलोलो लोकांना आणि त्यांच्या राजाला हें बैलावरोहणाचें कौशल्य लिव्हिंग्स्टन्नें पहिल्यानें शिकविलें. मग हे सगळेजण झांबेझीवर पोहोंचून तिच्या पात्रांतून वायव्येच्या बाजूनें पुढें पुढें गेले. हा प्रदेश नवा होता खरा, पण येथें एकादा ख्रिस्ती मठ स्थापावयास सोयीस्कर आणि हवाशीर जागा सांपडेल असें लिव्हिंग्स्टन् याला वाटेना. इतक्यांत, पोर्तुगीज प्रवाशांनीं तयार केलेला एक नकाशा त्याच्या हातीं पडला. तो पाहून त्याला वाटलें कीं, **काबोंपो** आणि **लिबा** या दोन नद्यांच्या संगमावर आपण प्रथम जावें; तेथून लिबा नदीच्या कांठानें वायव्येकडे गेलों तर **क्वान्झा नदी** ओलांडल्यावर आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील **लोंडा गांवाला** आपण जाऊन पोहोंचूं.

आतां **झांबेझीच्या** कांठानें वर सांगितलेल्या संगमावर पोहोंचावें आणि तेथून वायव्येकडे जातां जातां पश्चिम समुद्रावर जाऊन उभें रहावें ही कल्पना मोठी भव्य खरी; आणि ती खरी ठरली तर आफ्रिकेच्या मध्यापासून पश्चिम समुद्रापर्यंतचा टापू संशोधिल्याचें श्रेय लिव्हिंग्स्टन्ला मिळणार होतें हेंही खरें, पण या कामीं संकटें फार होतीं. म्हणून लिव्हिंग्स्टन् **चोबी नदीवर लिनयानती** गांवाला परत आला. तेथें त्यानें अनेक मोकोलोलो लोकांच्या गांठी घेतल्या. त्या सर्वांनीं त्याला एकदिलानें सांगितलें कीं, तुमच्याबरोबर कोठेंही येण्याची आमची तयारी आहे. शेवटीं त्यानें त्यांतील २७ लोक निवडले आणि मध्य आफ्रिकेंतील या ठिकाणाहून **झांबेझीच्या** उगमाकडे जातां जातां वर सांगितलेल्या नद्या ओलांडून पश्चिम किनारा गांठण्याचा निश्चय केला.

पण याच वेळीं लिव्हिंग्स्टन्‌ला तापानें गांठलें. झांबेझीच्या खोऱ्यांत विषारी मच्छर फार. हळू हळू तो बरा झाला. तोंपर्यंत बाकीचीही तयारी होत आली होती. त्याच्यापाशीं पांच बंदुका होत्या. सत्तावीस लोकांपैकीं तिघांच्या हातांत त्यानें तीन दिल्या आणि त्यांनीं सर्वांचें रक्षण करावें असें ठरविलें. उरलेल्या दोन दुसऱ्या दोघांच्या हातीं देऊन त्यांनीं रोजच्या शिध्यासाठीं वाटेंत शिकार करीत जावें असें सांगितलें. स्वतःसाठीं थोडीशीं बिस्किटें, कांहीं शेर चहा व साखर, दहा शेर कॉफी, थोडेसे सदरे, एक विजार आणि बूट येवढें साहित्य त्यानें बरोबर घेतलें. कोणी सुधारलेले लोक कोठें भेटलेच तर आपला युरोपियन तऱ्हेचा पोषाख जवळ असावा असें त्याला वाटलें ! दुसऱ्या एका संदुकेंत त्यानें कांहीं औषधांच्या कुप्या घेतल्या आणि तिसरींत कांहीं पुस्तकें वगैरे घेतलीं. एक मॅजिक लॅटर्न, खगोलाचें निरीक्षण करण्यासाठीं लागणारीं साधनेंही त्यानें बरोबर घेतलीं. शिवाय सुमारें दहा शेर कांचेचे मणी त्यानें एका पिशवींत घेतले. कोठें शिकार सांपडली नाहीं तर रानटी लोकांपासून खाद्य विकत घ्यावयास हे मणी उपयोगी पडणार होते. या सगळ्या सरंजामांत एक लहानसा तंबू, बकऱ्याच्या कातड्याचें एक पांघरूण आणि घोड्याच्या केसांचें तरट हेंही त्यानें बरोबर घेतलें होतें.

१८५३ नोव्हेंबर ११ ला लिव्हिंग्स्टन् हा लिन्यानतीहून निघाला. तो काबोंपो आणि लिबा यांच्या संगमावर २७ डिसेंबरला पोहोंचला. येथून मूळच्या योजनेप्रमाणें त्यानें लिबा नदीच्या उगमाकडे नावेंतूनच जावयास हवें होतें. परंतु बालुन्दा लोकांची राणी मनेंको हिची आणि त्याची तेथें गांठ पडली. तिनें त्याला आग्रह केला कीं, माझा भाऊ शिन्ते याला भेटल्याशिवाय तुम्हीं जाऊं नये. या बाईनें लिव्हिंग्स्टन्‌ला पोरासारखेंच वागविलें. बैलावर स्वार होऊन लिव्हिंग्स्टन तिच्या बरोबर

शिन्तेकडे जावयास निघाला. गर्द झाडी आणि लांबच लांब पसरलेल्या हिरवळी वाटेच्या दोन्हीं बाजूनें लागलेल्या होत्या. बरोबर मनेंकोचे पहारेकरी होतेच. कांहीं ठिकाणीं वाट काढावयाची म्हणजे कुऱ्हाडीनें झाडीतोड करावी लागे. आजूबाजूला दिसणारे वृक्ष प्रचंड राक्षसांसारखे उभे होते. बुंधा पन्नास पन्नास फूट उंच गेल्यानंतरच कांहींना फांद्या फुटलेल्या असत. ज्याला आपण छत्र्या असें म्हणतों त्या तर जिकडे तिकडे मनस्वी उगवलेल्या होत्या. त्या खायला गुळमट असल्यामुळें बरोबरच्या मोकोलोलोंनीं त्या गबागबा खाल्ल्या. दऱ्याखोऱ्यांतून पुढें जातां जातां मनेंकोचा भाऊ शिन्ते याच्या राजधानीला ते पोहोंचले.

चित्त्याचें कातडें हांथरलेल्या एका कट्टयावर हे राजेसरकार बसलेले होते आणि समोर त्याचा दरबार भरलेला होता. त्यांनीं अंगांत एक सुती कुडतें घातलें होतें आणि कमरेला रंगीबेरंगी लुंगी होती. त्यांच्या गळ्यांत मण्यांच्या माळा होत्या आणि हातांत तांब्याचीं आणि लोखंडाचीं सलकडीं होतीं. डोक्यावर एक मण्यांचें शिरस्त्राण बसविलें होतें. त्याच्यावर एक पिसांचा झुबका लावला होता. सिंहासनाच्या मागें या राजेश्वराच्या शेंकडों राण्यांचा एक जनानखाना बसलेला होता. त्याची पट्टराणी झुलू जातीची असून आग्नेयेकडील झांबेझिया या दूरच्या प्रदेशांतून ही त्यानें पैदा केली होती. समोर गवय्ये, बजवय्ये आणि नर्तनकार बसले होते. राजेसाहेबांनीं लिव्हिंग्स्टन्चा चांगला आदरसत्कार केला. लिव्हिंग्स्टन्नेंही जवळच्या साहित्यानें त्यांची बरीच करमणूक केली. त्यानें या रानटी लोकांना जादूचा कंदील दाखविला. त्यांतील तीं भर आकाराचीं माणसें पाहून हे अडाणी जीव अगदीं थिजून गेले. त्यांतील एक चित्र असें होतें कीं, हातांत तलवार घेऊन एक माणूस दुसऱ्या एकावर धावून जात आहे. प्रेक्षकांना वाटलें कीं, हा आपल्यावरच चाल करून येत आहे आणि मग ते

दरबारी लोक आणि त्या राण्या भयानें किंचाळ्या फोडीत एकमेकांना मागें लोटीत सुसाट पळत सुटल्या. राजेसाहेब मात्र खरे शूर होते. ते जागचे बिलकूल हलले नाहींत.

" लिबा नदीच्या पश्चिमेला लुबेल नांवाचा प्रदेश लागतो. तिकडील लोक सांगू लागले कीं, मध्य आफ्रिकेंत काटायांग्वो या नांवाचा एक जबरदस्त आफ्रिकन राजा आहे. परंतु हा नुकताच मेला होता. या राजाची हकीकत मोठी चमत्कारिक आहे. मधून मधून याच्या अंगांत येत असे. हातांत तलवार घेऊन हा आपल्या राजधानींत धांवत सुटे आणि वाटेंत सांपडणारीं माणसें कापून टाकून, सडकेच्या कांठीं त्यांचें ढीग घालीत असे. एरवींच्या वेळीं प्रधानांनीं जर त्याला विचारलें कीं, 'महाराज, आपण हें काय करतां ?' तर तो म्हणे कीं, 'माझ्या राज्यांत माणसांचा भारीच बुजबुजाट झालेला आहे. तो मी खच्ची करून टाकतों.' राजाला कांहीं जादूटोणा येत असे. या कामीं माणसांच्या विशेष अवयवांची जरूर असे. म्हणून तो वाटेल त्याला पकडून आणून ठार मारी आणि दाद कोणाकडे मागावी हें तर लोकांना कळत नसे. पोर्तुगीज किंवा अरब गुलामव्यापारवाले अनेक प्रकारच्या चिजा घेऊन या राजाकडे येत असत. राजानें गुलाम द्यावे आणि आमच्या चिजा घ्याव्या असा त्यांचा सवाल असे. मग राजा आपले शिपाई पाठवून आसपासच्या खेड्यांतील सारीं माणसें धरून आणी आणि गुलाम म्हणून या व्यापाऱ्यांना देऊन टाकी व आपल्याला हव्या असलेल्या चिजा त्यांच्याकडून घेई." लिव्हिंग्स्टन् त्याच्या प्रदेशांत पोहोंचावयाच्या आधींच हा दैत्य मरण पावला होता म्हणून बरें झालें !

लुबेल देशांतून लिव्हिंग्स्टन् दिलोलो सरोवरावर गेला. येथें काटेमा या नांवाच्या एका राजाची आणि त्याची गांठ पडली. " राजा आणि त्याची

प्रजा या मोठ्या रंगेल दिसल्या. पक्ष्यांचें गाणें ऐकत बसण्याचा यांना फार शोक असे; आणि इकडील पक्षीही फार गोड गातात." येथून तो **कसाई नदीच्या** कांठीं आला. ही नदी "**कांगो** नांवाच्या प्रसिद्ध नदीला मिळते. लोकांना विचारलें तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, या नदींतून तुम्हीं महिनोन-महिने जरी खालीं गेला तरी तुम्हांला तिचा अंत म्हणून लागावयाचा नाहीं."

**कसाई** नदी ओलांडून लिव्हिंग्स्टन् **किको देशांत** उतरला. येथील लोक महादंगेखोर आहेत. त्यांच्याशीं बोलतांना आणि देवघेव करतांना लिव्हिंग्स्टन् फार जपून वागला. नाहीं तर एकाद्या वेळीं त्याच्यावर भलताच प्रसंग गुदरला असता. हा किको प्रदेश नद्यानाल्यांनीं भरून गेलेला आहे. "एका नदींतून पुढें जावें तों दुसरी नदी लागते. कोठें पाणी कमरेइतकें असावें, तर कोठें गळ्याइतकें असावें. अंगावरचे कपडे सारखेच ओले रहात. असे दिवसांमागें दिवस चालले होते. उन्हाच्या वेळीं कपडे वाळवावे आणि पुन्हां पुढल्या नदींत शिरावें; कपड्यासकट पोहावें किंवा बैलाच्या शेपटीला धरून परतीराला जावें." असें होतां होतां शेवटीं लिव्हिंग्स्टन्ला ताप येऊं लागला आणि हगवणही लागली. बरोबरचे लोक एकमेकांत भांडूं लागले. सर्वांनाच पुष्कळदां अर्धपोटीं रहावें लागे. पण इतकीं संकटें आलीं तरी या भूमीचें संशोधन करीत करीत पश्चिम किनाऱ्यावरील **अंगोला** या गावीं जाण्याचा आपला निश्चय लिव्हिंग्स्टन्नें बिलकूल सोडला नाहीं.

वायव्येकडे जातां जातां **क्वांगो नदी** लागली. ही तरून जावयाची म्हणजे एका नावेची जरूर होती. पण कांठच्या एका गांवांतील रानटी नावाडी म्हणाले कीं, तुमच्या मोकोलोलो माणसांपैकीं एकादें आम्हांला गुलाम म्हणून द्याल तरच आम्हीं आमची नाव तुम्हांला देऊं. लिव्हिंग्स्टन्चें गाडें अगदींच अडून पडल्यासारखें झालें. पण इतक्यांत सुदैवानें

सायप्रियानो डी अब्रू या नांवाचा एक आडजातीचा पोर्तुगीज हवालदार त्याला भेटला. त्यानें त्याला सल्ला दिला कीं, तुम्हीं या लोकांपासून पहिल्यानें दूर निघून जा. बोभाटा न करतां सर्वजण नदीच्या कांठाकडे निघून गेले. हें पाहतांच त्या रानटी गांवकऱ्यांनीं त्यांच्यावर बंदुका झाडल्या. सुदैवानें कोणास कांहीं झालें नाहीं. सायप्रियानो यानें आंबेकऱ्यांचें मन वळविलें आणि ही सारी मंडळी क्वांगोच्या पलीकडल्या तीराला पोहोंचली. तेथें त्यांचे मोठें प्रेमळ स्वागत झालें.

येथें एक पोर्तुगीजांची वसाहत होती. आसपासच्या लोकांना पोर्तुगीज मिशनऱ्यांनीं दीक्षा दिली होती. मिशनऱ्यांनीं त्यांना लिहिणेंवाचणेंही शिकवलें होतें. धर्मशिक्षणाबरोबर त्यांनीं त्यांना संस्कृतीचीही कल्पना दिली होती. वसाहतींत पोहोंचतांच लिव्हिंग्स्टन्ला अगदीं हायसें झालें. कोलोबेन सोडल्यापासून ही पहिलीच सुसंस्कृत वस्ती त्याला भेटली. या लोकांनी पाहुण्यांना चांगलें खाऊं घातलें; त्यांच्या सर्व तऱ्हेच्या सोयी करून दिल्या; आणि ते त्यांच्याशीं फार ममताळूपणानें वागले. तेथें एक वाचनालय व दवाखाना हीं सुद्धां होतीं.

ताजेतवाने झाल्यावर हे लोक पुन्हां पायपिटीला निघाले ! पांच दिवस प्रवास केल्यावर **कसानजी** या नांवाचें एक पोर्तुगीज शहर त्यांना लागलें. येथील पोर्तुगीजांनीं तर आदरातिथ्याची कमालच केली. लिव्हिंग्स्टन् म्हणाला, " आमच्या अडचणीच्या वेळीं हे उपयोगी पडले. परमेश्वर त्यांच्यावर कृपा करो." येथून निघून लिव्हिंग्स्टन् क्वान्झा नदीवर गेला. तेथून पुढें नाना प्रकारच्या पिकांनीं आणि फळझाडांनीं भरलेल्या प्रदेशा-तून ते समुद्रकांठाकडे चालले होते. वाटेंत जेसुईट मिशनऱ्यांची एक वस्ती लागली. या धार्मिकांनीं नाना प्रकारचीं फळें पाहुण्यांपुढें आणून ठेवलीं. त्यांचा स्वीकार करून लिव्हिंग्स्टन् जलदीनें पुढें निघाला आणि

**लोंडा पठाराच्या** पलीकडच्या कांठाला पोहोंचला. तेथें त्या मोकोलेलो लोकांनीं तो अफाट समुद्र पाहिला. आश्चर्यचकित होऊन ते म्हणाले, " भूमीला अंत नाहीं असे आमचे वाडवडील सांगत होते. पण भूमी स्वतःच आतां आम्हांला सांगत आहे, ' माझी सद्दी आतां संपली आहे.' "

**लोंडा** शहरांत शिरतांना लिव्हिंग्स्टन् हा मनांत थोडासा सर्दच झालेला होता. या शहरांतील नागरी वृत्तीचे लोक आणि अधिकारी आपल्याशीं कसे वागतील अशी शंका त्याला येत होती. येथें इंग्रज सरकारचा एक वकील आहे असेंही त्यानें ऐकलें होतें, पण तो आपल्याला कितपत मोजतो असें तो आपल्याशींच म्हणत होता. शिवाय तो स्वतः तापानें आणि हगवणीनें अगदीं चिंबून गेला होता. आणि जर या लोंडा गांवीं त्याची उपेक्षा झाली असती तर तो तेथें खचितच मरून गेला असता. पण वकिलातींत जातो तों वकीलसाहेब हास्यवदनानें पुढें आले आणि थेट इंग्लिश पद्धतीनें त्यांनीं त्याचें स्वागत केलें. " तुम्हीं आजारी आहां, तर आतां विश्रान्ति घ्या." असें तो म्हणाला. त्यानें उत्तम बिछाना हांथरला आणि जेव्हां त्यांत लिव्हिंग्स्टन् गुरगटून पडला तेव्हां त्याला पराकाष्ठेचें सुख झालें. आज सहा महिने झाले, तो भुईवर एका रकस्यावर निजत होता. पोर्तुगीज अधिकाऱ्यांनींही त्याची उत्तम बडदास्त ठेवली. हळूहळू तो बरा झाला आणि आरंभापासूनचें सर्व इतिवृत्त त्यानें लिहून काढलें आणि प्रवासाचे नकाशेही तयार केले.

याच सुमाराला फोर रनर या नांवाचें एक इंग्लिश जहाज लोंडा येथें येऊन पोहोंचलें. आफ्रिकन स्टीम शिप् या कंपनीच्या मनांत पश्चिम आफ्रिकेशीं दळणवळण ठेवावें आणि व्यापार चालू करावा असें फार होतें. म्हणून तिनें हें फोर रनर जहाज लोंडा येथें पाठवून दिलें होतें. लिव्हिंग्स्टन्ला वाटलें कीं स्वदेशांत पाठवून देण्यासाठीं तयार केलेले

नकाशे, प्रवासवृत्तें व लिहिलेलीं टिपणें या बोटींतून पाठवून द्यावीं. त्या प्रमाणें एक मोठा पेटारा भरून तो त्यानें फोर रनरवर पाठवला. दुर्दैव असें कीं, हें जहाज उत्तरेकडे जातां जातां मदिरा बेटापाशीं एका वादळांत सांपडलें व खडकावर आपटून फुटलें आणि लिव्हिंग्स्टन्नें पाठवलेले सगळे कागदपत्र समुद्रस्तृप्यन्तु झाले. कागदपत्र रवाना करून झांबेझीकडे जाण्यासाठीं तो निघाला होता. वाटेंत पंडो अंडोगा येथें त्याचा मुक्काम होता. तेथें त्याला ही जहाज बुडाल्याची वार्ता कळली. धीर न सोडतां त्यानें पुन्हां सर्व नकाशे काढले. आठवण करकरून प्रवासाचा सर्व इतिहास त्यानें लिहून काढला आणि हें सर्व साहित्य बंदरावर पुन्हां पाठवून दिलें. दुसऱ्या एका नावेनें हें सर्व लंडन येथें सुखरूप पोहोंचलें.

लोंडा येथें असतांना, आपल्या बरोबरच्या मोकोलोलो लोकांना त्यानें स्वस्थ बसूं दिलें नाहीं. बंदराच्या गोदींतलीं कामें करणें, लांकडें तोडणें, असल्या कामांवर त्यानें त्यांना लावलें. मिळालेल्या पैशांतून तुमच्या तिकडील प्रदेशांत खपतील अशा हव्या त्या चिजा विकत घ्या, असें त्यांना सांगितलें. तो स्वतः अतिसारानें आजारीच होता. तथापि पुन्हां सर्व कांहीं सुरळीत चालूं झालें आणि अंडोगो गांवचा मुक्काम संपवून ते झांबेझीच्या दिशेला वळले. पोर्तुगीज अधिकाऱ्यांनीं बंदरांत असतांना तर त्यांची सरबराई चांगली केलीच होती. पण कांगो नदीला ते पोहोंचेतोंपर्यंत पुरेल इतकें सामानसुमानही त्यांनीं त्यांना दिलें. त्यांची अपेक्षा अशी होती कीं, झांबेझी नदींतून खालीं जातां जातां पोर्तुगीजांच्या टिटी या ठाण्यावर हे जातील आणि तेथून झांबेझीच्या मुखांतून शेवटीं हिन्दी महासागराच्या किनाऱ्याला पोहोंचतील. म्हणून लोंड्याच्या पोर्तुगीज अंमलदारांनीं टिटीच्या पोर्तुगीज अंमलदारांना देण्यासाठीं लिव्हिंग्स्टन्पाशीं ओळखीचीं पत्रें दिलीं. कांहीं ब्रिटिश खलाशांनीं त्याला

एक उत्तमसा तंबू दिला त्याच्या स्वारींतील प्रत्येक माणसाला त्यांनीं एक बंदूक आणि दारूगोळाही दिला. त्याला पोहोंचवायला म्हणून बंदरचा ब्रिटिश अधिकारी एडमंड गॅब्रियल हा कान्झा नदीपर्यंत गेला.

आफ्रिका खंडाचें संशोधन हा या काळांत युरोपांतील साहसी प्रवाशांचा एक हव्यासच होऊन बसला होता. प्रत्येक देशाच्या सरकारला हें माहीत झालें होतें कीं, आपल्या देशांतला कोणीही प्रवासी गेला तर आफ्रिकेच्या ज्या प्रदेशांत जाऊन तो आपलें निशाण पहिल्यानें लावील तो प्रदेश आपल्या मालकीचा होतो. आजवर पृथ्वीवर जीं भौगोलिक संशोधनें झालीं होतीं त्यांच्या द्वारां हाच संकेत रूढ झाला होता. अर्थात् आफ्रिका खंडावर चारी दिशांनीं पाश्चिमात्य राष्ट्रांची स्वारी सुरू झाली होती. हॉलंडमधील कांहीं लोक तर यापूर्वीच दोन पिढ्या ट्रान्सवाल नदीच्या खोऱ्यांत येऊन दाखल झाले होते. म्हणजे दक्षिणेकडून त्यांनीं बराच आंतपर्यंत प्रवास केला होता. तेथें आपलीं घरेंदारें करून त्यांनीं तो प्रदेश आपलाच केला होता. पण आतां ट्यूनिसकडून फ्रेंच, ईजिप्त-मधून इंग्रज असे उत्तरेकडून शिरूं लागले होते. झांझिबार या पूर्व किनाऱ्यावरील ठाण्यांतून आणि लोंडा या पश्चिम किनाऱ्यावरील ठाण्यांतून पोर्तुगीजांनीं आपली मोहीम चालू केली होती. केपटाऊन येथें आपलें ठाणें बळकट करून इंग्रजांनीं दक्षिणेकडूनही कूच सुरू केलें होतें. यांतच कांहीं जर्मन लोकही येऊन मिळाले आणि थोड्या वर्षांनीं बेल्जम लोकही या चढाओढींत शिरले.

एक ध्यानांत हवें कीं, स्वारी, मोहिम, कूच असे लष्करी शब्द या वर्णनांत आलेले असले तरी यांत लष्करांचा कसलाही संबंध नव्हता. हीं सगळीं कामें हौशी आणि साहसी प्रवाशांनीं अंगावर घेतलीं होतीं. या प्रवाशांतील बहुतेक लोक मिशनरी होते. रानटी लोकांशीं गांठी पडल्या

म्हणजे त्यांच्याशीं नरमाईनें वागावें, त्यांच्या भाषांचा अभ्यास करावा, त्यांच्या बऱ्यावाईटाची विचारपूस करावी, त्यांना औषधपाणी द्यावें, कांहीं सौंदर्याचीं साधनें त्यांना मौजेनें द्यावीं, त्यांच्या राजांच्या गांठी घ्याव्या आणि त्यांनाही कांहीं अलोलकीच्या वस्तू देऊन खूष करावें व येशु ख्रिस्ताचा संदेश सांगावा, ही त्यांची कामाची पद्धति असे. पण मुख्य म्हणजे या खंडाचें प्रथम भौगोलिक आणि मग सर्व तऱ्हेचें संशोधन करावें व आपल्या सरकाराकडे इतिवृत्त पाठवावें असा त्यांचा क्रम असे.

अशा प्रकारें हे सारे प्रवासी चोहोंबाजूंनीं आंत शिरले तरी अजून मध्य आफ्रिका म्हणजे काय आहे हें कोणासच नीट कळलेलें नव्हतें. या खंडाचा सगळा किनारा युरोपियन लोकांनीं पाहिलेला होता. त्यावरील अनेक बंदरांत त्यांनीं आपलीं ठाणींही मांडलीं होतीं. या ठाण्यांतून कोणी शंभर मैल, कोणी चारशें मैल, असे आंत गेले होते. पण उत्तर, पश्चिम आणि दक्षिण इकडच्या टापूत तरी जाणारांना असें वाटूं लागलें होतें कीं, आफ्रिका खंड म्हणजे वाळून कोळ झालेली शुष्क भूमी आहे. तथापि मधून मधून तद्देशीय लोकांच्या तोंडून, मध्य आफ्रिकेंतील नद्यांची, अरण्यांची आणि सरोवरांचीं वर्णनें त्यांनीं ऐकलेलीं होतीं. म्हणून विशेष साहसी मिशनरी मध्य आफ्रिकेच्या संशोधनाला प्रवृत्त झाले होते. त्यांत लिव्हिंग्स्टन् हा अग्रगण्य होय असें म्हटलें पाहिजे.

आतांपर्यंत तो दक्षिणेकडील **केपटाऊन** पासून वर जातां जातां अनेक वाळवंटें, वैराणें, अरण्यें, तुडवीत तुडवीत **गामी सरोवरापर्यंत** पोहोंचला होता. तेथून त्यानें दुसरी स्वारी सुरू केली; आणि **चोबी नदी** ओलांडून तो **झांबेझीच्या** कांठीं जाऊन उभा राहिला होता. तिसऱ्या स्वारींत तो वायव्येकडे वळला आणि **कार्बोपो** आणि **लुबा** यांच्या संगमावरून पुढें जातां जातां **क्वांगो** नदीवर गेला. शेवटीं **अंगोला** प्रांताच्या

**लोंडा** बंदराला जाऊन तो पोहोंचला. सामान्यपणें सरळ रेषेनें पाहतां हें अंतर २००० मैलांचें असेल. पण प्रवास कधीं सरळ रेषेनें होत नाहीं हें आपल्याला माहीत आहे! म्हणून लिव्हिंग्स्टन्चा हा प्रवास ३००० मैलांचा झाला असला पाहिजे असें समजावें. यांत त्याचे मनस्वी हाल झाले. त्याच्या जिवावर अनेकदां बेतली. अनेक जिवावरचीं दुखणीं आलीं. बायकामुलांपासून त्याची पुन्हां पुन्हां ताटातूट झाली. त्याला अनेक लोकांच्या भाषांचे अभ्यास करावे लागले. बैलगाडींतून, घोड्यावरून. किंवा बैलांच्या पाठीवरून त्याला प्रवास करावा लागे; शेकडों मैल पायीं चालावें लागे. पाणघोड्यांनीं भरलेल्या नद्यांतून रानटी लोकांच्या होडग्यांत बसून त्याला जावें लागलें, कोठें गळयाइतक्या पाण्यांतून वाट काढावी लागली; कोठें बैलांच्या शेपटीला धरून पाण्यांतून जावें लागलें; पण या हिंमतबाज माणसानें संशोधनाचें काम अखंड चालू ठेवलें.

**अंडोंगा** हें पोर्तुगीजांचें ठिकाण सोडून लिव्हिंग्स्टन् पूर्वेच्या रोखानें निघाला हें वर सांगितलेंच आहे. कांहीं पोर्तुगीज प्रवासी त्या दिशेनें चाललेले होते. दक्षिण **क्वाँगोलँन्डमधील** एका टापूकडे ते चालले होते. शेवटपर्यंत त्यांच्याबरोबर जर त्याला जातां आलें असतें तर कॅमेरॉन आणि कांहीं जर्मन प्रवासी तिकडे जाऊन पोहोंचावयाच्या आधींच तो जाऊन पोहोंचला असता; आणि त्या टापूचें संशोधन केल्याचें श्रेय त्याला मिळालें असतें. परंतु बरोबरचे लोक आतां कुरकुर करूं लागले. ते रानटी खरे, पण त्यांनाही घरेंदारें आणि बायकापोरें होतीं. ते म्हणाले, “आतां आम्हीं तुमच्याबरोबर येणार नाहीं.” अर्थात् लिव्हिंग्स्टन्ला आपला सगळा बेत बदलावा लागला आणि त्यानें काँगोकडे जाण्याचा नाद सोडून दिला. तो उजव्या हाताला मोकोलोलो प्रदेशाकडे वळला. ज्याच्या पाठीवर बसून त्यानें अनेक मजला मारल्या होत्या तो

त्याचा आवडता नंदी सिंदबाद हा माशा चावल्यानें मरून गेला. त्यामुळें **सिषेकी नदीपर्यंत** त्याला पायींच चालावें लागलें. मोकोंलोलो प्रदेशांत त्याचे पुष्कळच मित्र झालेले होते. सिषेकी येथें त्यांनीं त्याचें स्वागत मोठ्या आनंदानें केलें. तेथें त्याचीं पुष्कळ पत्रें येऊन पडलीं होतीं. खालीं येतां येतां तो **चोबी** नदीच्या कांठीं **लिन्यानती** येथें आला; आणि तेथें त्याचा तो दहा बैलांनीं ओढावयाचा दोन वर्षांपूर्वींचा गाडा आणि त्यांतलें सामानसुमान हें जसेच्या तसें त्याच्या हातीं लागलें.

**लिनयानती** येथें तो बरेच दिवस राहिला. मधून मधून पुष्कळ विश्रान्ति घेतल्याशिवाय त्याची प्रकृति नीट राहिली नसती. येथें त्याची आणि एका अरब प्रवाशाची गाठ पडली. हा प्रवासी आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील टापूंत बराच हिंडलेला होता. **झांझिबार, न्यासा सरोवर, टांगानिकाचें पठार, झांबेझी नदी** इत्यादिकांविषयीं बरीच बारीक सारीक माहिती त्यानें लिव्हिंग्स्टन्‌ला सांगितली. त्याचें म्हणणें असें कीं, टांगानिका पठाराकडून आपल्याबरोबर लिव्हिंगस्टन्‌नें **झांझिबारकडे** यावें. पण विचार करतां करतां लिव्हिंग्स्टन्‌ला हेंच बरें वाटलें कीं, संशोधनाच्या दृष्टीनें मध्य आफ्रिकेंतून झांबेझीच्या किनाऱ्यानें पूर्वेकडील हिंदी महासागरापर्यंत जाऊन पोहोंचावें. पण त्यानें असें ठरविलें तरी त्या अरब प्रवाशानें दिलेली माहिती मात्र त्याला फार आकर्षक वाटली, यांत कांहींच संदेह नाहीं.

बरोबरचे जुने मोकोलोलो प्रवासी त्यानें आतां सोडून दिले आणि ११४ नवीन माणसांची भरती केली. बारा बैल त्यानें बरोबर घेतले आणि रानटी लोकांना मोबदला देण्यासारख्या पुष्कळशा चिजा घेतल्या. लोणी आणि मध यांचेही डबे त्यानें बरोबर घेतले. १८५५ नोव्हेंबर ३ ला लिन्या-नूतीहून तो पूर्व दिशेला निघाला. पश्चिम किनाऱ्यापर्यंतचा त्याचा हा प्रवास

पोर्तुगीजांच्या मदतीनें तडीस गेला होता. आतांचा हा प्रवास मोकोलोलो लोकांचा राजा सिकेलेतु याच्या मदतीनें होणार होता.

प्रवासाला निघण्यापूर्वी पुढें **व्हिक्टोरिया फॉल्स** हें नांव त्यानें ज्या



धबधब्याला दिलें त्याच्याविषयीं रानटी लोकांच्या तोंडून त्यानें बरेचसे ऐकलें होतें.

" झांबेझी नदीच्या पात्रांत एक मैलभर रुंदीचा कडा अकस्मात् तुटलेला आहे; आणि तेवढ्या कड्यावरून ही नदी खालच्या दरींत उडी घेते. पाण्याच्या घोषानें माणसांच्या कानठळ्या बसतात. दरींतून वर उडणाऱ्या तुषारांचें प्रचंड मेघच बनतात. रानटी लोकांना वाटतें कीं, तुषारांच्या मेघांतूनच हा घोष होतो आहे. या मेघांना ते ' धूर ' असें म्हणतात. म्हणून या स्थळाला " गर्जना करणाऱ्या धुराचें ठिकाण " असें नांव त्यांनीं दिलेलें आहे. " १८८५ नोव्हेंबर १८ ला लिव्हिंग्स्टन् या धबधब्यापाशीं येऊन पोहोंचला. त्याचा तो प्रचंडपणा पाहून तो क्षणभर सुन्नच होऊन गेला. या धबधब्याचें नांव त्याला माहीत नव्हतें. म्हणून क्षणाचाही वेळ न घेतां त्यानें याला ' व्हिक्टोरिया फॉलस ' असें नांव दिलें. या वेळीं इंग्लंडच्या सिंहासनावर व्हिक्टोरिया राणी होती, हे सर्वांना माहीतच आहे. या धबधब्याचें वर्णन चॅपमन् यानें फार सुंदर केलें आहे. धबधब्याची कांहींशी कल्पना शेजारीं दिलेल्या चित्रावरून येईल. येवढ्या पाण्यानिशीं दरींत उडी घेणारा आणि भोंवतालचा प्रदेश नादाऊन टाकणारा येवढा दुसरा धबधबा पृथ्वीवर नाहीं. व्हिक्टोरिया फॉल्स हें नांव याला देण्याचा मान लिव्हिंग्स्टन्नें मिळाविला हें विशेष आहे.

याच्या आसपास एका लहानशा बेटावर बरोबर आणलेल्या कांहीं फळझाडांचें बीं त्यानें लावलें; आणि या देखाव्याकडे पहात शेकडों वर्षें उभें असलेल्या एका दांडग्या वृक्षाच्या बुंध्यावर त्यानें आपलें नांव कोरून ठेवलें. लावलेलें बीं उगवलें पण शेजारच्या पाण्यांतील पाणघोड्यांनीं तीं रोपटीं खाऊन टाकलीं. झाडावर कोरलेलें नांव अजून शिल्लक आहे कीं नाहीं हें माहीत नाहीं. पण डॉ. लिव्हिंग्स्टन् यानें या प्रपाताला व्हिक्टोरिया फॉल्स हें नांव दिलें ही गोष्ट इंग्रजांच्या इतिहासांत अमर होऊन राहिली आहे.

पुढें जातां जातां शुद्ध नागव्यानें हिंडणारे रानटी लोक त्याला भेटले. हा प्रदेश ओलांडून झांबेझीला उत्तरेकडून मिळणाऱ्या काफू आणि लांग्वा या दोन नद्या उतरल्यावर लिव्हिंग्स्टन् झंबो येथें येऊन पोहोंचला. हें झंबो नांवाचें ठाणें आतांपर्यंत पुष्कळच प्रसिद्धी पावलेलें होतें. येथें पूर्वी एक जेसुईट मिशनऱ्यांचा मठ होता. पोर्तुगीजांचेंही एक नाकें येथें होतें. लिव्हिंग्स्टन् पोहोंचला तेव्हांसुद्धां झांबेझी नदीच्या मुखाकडून झंबोपर्यंत जहाजांची ये जा चालू असे. अर्थात् ही पाण्यावरची रहदारी या वेळीं अगदींच थोडी होती. परंतु हिन्दी महासागरांतील व्यापार आफ्रिका खंडांत या झंबोपर्यंत येऊन पोहोंचला होता. या पोर्तुगीजांच्या ठाण्याच्या मागल्या अंगाला काळेभोर उंच उंच पहाड उभे होते. व्यापारी लोकांनीं आपलीं घरें एका पठारावर बांधलेलीं असून खालीं झालेला नद्यांचा संगम त्यांच्या अंगणातून स्वच्छ दिसत असे. नद्यांच्या कांठीं गव्हाची लागवड होत असे आणि गव्हाचा दाणा नेहमीच्या गव्हाच्या दुप्पट जाड असे.

झंबोहून लिव्हिंग्स्टन् नदीच्या कांठानें आग्नेयेच्या बाजूला टिटी गांवाला निघाला. पण या टापूंतील रानटी लोकांना गोऱ्या लोकांविषयीं अविश्वास उत्पन्न झालेला असल्यामुळें ते लिव्हिंग्स्टन्शीं कसलाही संबंध ठेवीनात. पण त्याचा असल्या शेकडों रानटी जातींशीं आधींच प्रसंग आलेला असल्यामुळें, कोणाशीं कसें वागावें आणि कोण कशानें वश होतो, हें त्याला फार चांगलें कळलेलें होतें. धीमेपणा, सभ्यपणा, पण आपला हेतू न सोडण्याची खात्रीरी या गुणांची आवश्यकता रानटी लोकांशीं वागतांना फार असते. शिवाय मधून मधून आपल्या संग्रहांतील एकादी गमतीची चीज या बालस्वभावाच्या लोकांना द्यावी लागते. असें करतां करतां कसलाही खटका न येतां, झांबेझी नदीच्या दक्षिणतीरावरील पोर्तुगीज लोकांच्या टिटी शहरांत लिव्हिंग्स्टन् येऊन पोहोंचला. ज्याला सुधारलेलें जग म्हणतात त्याची आणि लिव्हिंग्स्टन्ची पुन्हां एकदां गांठ पडली.

आपल्याला माहीतच आहे कीं, आफ्रिका खंडाच्या पश्चिम किनाऱ्यावर लोंडा येथें लिव्हिंग्स्टन् जाऊन पोहोंचला होता. आतां तो पूर्वकिनाऱ्यापासून जवळच असलेल्या टिटी गांवाला येऊन पोहोंचला. येथून जहाजांत बसून समुद्रकांठच्या केलिमेन बंदरावर तो सपकन् गेला. येथें फ्रॉलिक नांवाची एक इंग्लिश नौका येऊन उभी राहिली होती. केपटाऊन येथें येऊन पडलेलीं त्याचीं सारीं पत्रें, लंडन मिशनरी सोसायटीनें त्याला पाठविलेले पैसे आणि त्याला हवें असलेलें हरतऱ्हेचें मुबलक साहित्य या नौकेच्या तांडेलानें त्याला दिलें. शिवाय, ब्रिटिश सरकारनें लिव्हिंग्स्टन्साठीं एक परतीचा परवानाही दिला होता. तो घेऊन लिव्हिंग्स्टन् मॉरिशस बेटाकडे गेला. तिकडून एडनला जाऊन मार्सेलिस आणि पॅरिस या वाटेनें १८५६ डिसेंबर १२ ला तो लंडन येथें सुखरूप पोहोंचला.

केपटाऊनपासून दक्षिणोत्तर सुमारें दीड हजार मैल आणि आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावरील लोंडापासून तों पूर्व किनाऱ्यावरील केलिमेन पर्यंत सुमारें दोन हजार मैल एवढा प्रवास त्यानें आतांपर्यंत केला होता.

इंग्लंडमधील लोक आज कित्येक दिवस त्याचें नुसतें नांवच ऐकत होते. आफ्रिका खंडाचें एवढें विशाल भूपृष्ठ पायांखालीं घालून, शेकडों जमाती आणि शेकडों स्थलविशेष यांची ओळख करून घेऊन, मातृभूमीचें नांव विशेष प्रसिद्ध करणाऱ्या या लिव्हिंग्स्टन्चें स्वागत लोकांनीं फार हौसेनें केलें. त्यानें केलेले शोध खरेखरे क्रान्तिकारक होते. १८५८ च्या फेब्रुआरींत क्वेलिमेन येथील वकिलातीवर सरकारनें त्याची नेमणूक केली आणि झांबेझी नदीचें खोरें शोधून काढण्याचें कामही सरकारनें त्याच्याचकडे दिलें. एक डॉक्टर, एक प्राणिशास्त्रवेत्ता, एक भूस्तर विद्या जाणणारा, एक चित्रकार, अशी अनेक मंडळी सरकारनें त्याच्याबरोबर दिलीं. अवश्य असलेला इतर सर्व सरंजाम बरोबर घेऊन लिव्हिंग्स्टन् पुन्हां झांबेझीकडे गेला.




डॉक्टर लिव्हिंग्स्टनचा प्रवासमार्ग

शेजारीं दिलेल्या नकाशांतील कांहीं स्थळें वाचकांनीं आधींच मुद्दाम पाहून ठेवावयास हवीं . **न्यांग्वी, डेलगाडो बंदर, रुबुमा नदी, न्यासा सरोवर, बांग्वुलू सरोवर, टांगानिका, उजिजी चिंताबो,** हीं नावें त्यांना पुन्हां पुन्हां भेटतील. लहान लहान तराफे बरोबर घेऊन झांबेझी नदीचा सारा मुखप्रदेश लिव्हिंग्स्टन्नें हिंडून पाहिला. पुढें त्याला दिसून आलें कीं, शिरे नदींतून वर गेलें असतां आपला पुढील प्रवास खरा उपयोगी ठरणार आहे. याप्रमाणें **शिरे नदींतून** वर गेल्यावर तो **न्यासा सरोवरावर** पोहोंचला. या सरोवरावर पूर्वीं एक युरोपियन माणूस गेलेला होता; पण आफ्रिकेच्या पृष्ठावर तें नेमकें कोठें आहे, हें त्याला नकाशांत दाखवतां आलें नव्हतें. लिव्हिंगस्टन्नें आपलें अक्षांशरेखांशाचें ज्ञान चालवून, या सरोवराची जागा नकाशांत कायम केली. मग त्याच्या दक्षिण टोकाकडे जाऊन तो पुन्हां झांबेझी नदीवर येऊन पोहोंचला.

येथें पोर्तुगीज लोकांनीं त्याला बराच उपद्रव दिला. कारण लिव्हिंग्स्टन् हा नुसता हौशी प्रवासी नसून, इंग्लडसाठीं नव्या नव्या प्रदेशाची कमाई सुद्धां करतो, असें दिसून आल्यामुळें त्यांच्या पोटांत राजकीय मत्सर उत्पन्न झाला होता. परंतु लिव्हिंग्स्टन्नें हाही प्रसंग खुबीनें निभावून नेला; आणि १८६० मध्यें व्हिक्टोरिया धबधब्यावरून तो **मोकोलोलो देशांत** पुन्हां एकदां आला. तेथें तो पूर्वींचा सिकेलेतू राजा त्याला भेटला. पण या वेळीं तो महारोगानें जर्जर झालेला होता; आणि तो कोणाशींच नीट वागेनासा झाला होता. तथापि लिव्हिंग्स्टन्च्या बरोबर असलेल्या डॉक्टरानें दिलेल्या औषधामुळें थोडासा गुण आल्यामुळें, " माझ्या राज्यांतलि बुटोंगा पठारावर तुम्हीं आपली एक वसाहत बेलाशक स्थापन करा " अशी परवानगी त्यानें लिव्हिंग्स्टन्ला दिली.

तेथून निघून तो पुन्हां **टिटी शहराला** आला. या गांवाच्या थोडेसें खालीं नदीला एक मोठा खळखळाट आहे. त्यांतून नाव नेणें खरें

पाहिलें असतां धोक्याचें होतें. परंतु लिव्हिंग्स्टन्च्या हातून थोडासा अविचारच झाला. पाण्याच्या खळखळाटांत नाव पालथी झाली. आंतलें सामानसुमान आणि कागदपत्रें बुडून गेलीं, पण माणसें मात्र बचावलीं. या वेळीं लिव्हिंग्स्टन् पुन्हां एकदा आजारी पडला. दरम्यान ऑक्सफर्ड आणि केंब्रिज या विश्वविद्यालयांनीं सहा मिशनरी याच कामासाठीं इकडे पाठविले होते. तेही येथें येऊन पोहोंचले.

हे सर्वजण मिळून डेलगाडो भूशिरापाशीं जी रुवुमा नदी हिन्दी महासाराला मिळते तिच्या पात्रांतून वर पूर्वेकडे निघाले. त्यांना वाटत होतें कीं, इकडून न्यासा सरोवराला पोहोंचतां येईल. पण त्यांची नांव नदीच्या पाण्यांतून तीस मैलांहून पुढें जाईना. इतक्यांत नावेवरचे अधिकारी आजारी पडले; आणि ही सारी मंडळी झांबेझीकडे परत आली. परंतु लिव्हिंगस्टन् हा पराभव खाणारा माणूस नव्हता. दुसरी एक लहानशी नाव गाडीवर घेऊन तो भूमीच्या मार्गानेंच न्यासा सरोवराला जाऊन पोहोंचला आणि त्या सरोवराचा पश्चिम किनारा बराच दूरवर जाऊन त्यानें नावेनें पाहिला.

१८६२ च्या आरंभीं त्याची बायको इकडे आफ्रिकेंत आली. तिच्या-बरोबर आणखी दुसऱ्या दोन स्त्रिया होत्या. कदाचित् त्यांच्याही मनांत या संशोधनाच्या कामांत पडावयाचें असेल. पण याच वेळीं गुलामांचा व्यापार करणारे कांहीं मुसलमान शिरे पठारावर हल्ले करूं लागले. त्यामुळें इकडल्या टापूंतील मिशनऱ्यांचें सर्व काम विसकटून गेलें. त्यांतच मॅकेन्झी नांवाचा एक बिशप आजारी पडून मरण पावला आणि अजून झांबेझी नदीच्या कांठीं असलेल्या लिव्हिंग्स्टन्बाई याही आजारी पडून मरण पावल्या. चट सारे मिशनरी इकडल्या टापूंतून निघून गेले. पण लिव्हिंग्स्टन् मात्र आपला हट्ट सोडीना.

रुवुमा नदीच्या मुखांतून पुष्कळ वर गेलें असतां न्यासा सरोवराला जातां येईल असा त्याचा कयास होता. म्हणून त्यानें पुन्हां एकदां त्या नदींत शिरून पाहिलें. पण कितीही शिकस्त केली तरी एकशेंसाठ मैलाहून जास्त पुढें जातां येत नाहीं, असें त्याला दिसून आलें. त्याच्या-बरोबर असलेला डॉक्टर हा हगवणीनें आजारी पडला; आणि झांबेझी सोडून त्याला परत जावें लागलें. आपणही स्वतः आतां रुवुमा नदीचा नाद सोडला पाहिजे, हें लिव्हिंग्स्टन्च्या ध्यानीं आलें. शेवटीं **शिरे नदींतून** तो बराचसा वर गेला. मग न्यासा सरोवराला त्यानें नैर्ऋत्येच्या बाजूनेंच पायीं वळसा घातला. जातां जातां **कोटाकोटा** या अरब वसाहतीला तो जाऊन पोहोंचला. तेथें थोडासा मुक्काम करून तो थेट पश्चिमेकडे निघाला आणि **लांग्वा नदीवर** येऊन पोहोंचला. येथें त्याला कळलें कीं, आणखी थोडेसें पुढें गेलें तर **बांग्वुलू सरोवरावर** जातां येतें.

हा पुढला प्रवास या वेळीं त्याच्या हातून झाला असता, तर त्याला फार बरें वाटलें असतें. पण इतक्यांत ब्रिटिश सरकारची मर्जी बदलली आणि त्यांनीं हुकूम धाडला कीं, तुमचें तिकडील काम आम्हीं आतां बंद केलें आहे. तुम्हीं ताबडतोब निघून यावें. सगळीं कामें अर्धवट टाकून देऊन लिव्हिंग्स्टन हिन्दी महासागरांतून मुंबईला आला आणि तेथून ईजिप्तवरून १८६४ च्या जुलै महिन्यांत लंडनला पोहोंचला.

वास्तविक पाहतां त्यानें या नव्या मोहिमेंत केलेलें काम सुद्धां पुष्कळच महत्त्वाचें होतें. परंतु घरीं पोहोंचल्यावर त्याला दिसून आलें कीं, आपल्या संबंधानें येथें बरीच अप्रियता उत्पन्न झाली आहे. तथापि हळूं-हळूं त्याच्या आफ्रिकेच्या कामगिरीचें महत्व लहान–थोरांना पटूं लागलें. जर या माणसानें आपलें आतांपर्यंतचें जीवित भूपृष्ठाच्या संशोधनासाठीं आणि आपल्या देशाच्या हितासाठीं आजवर इतकें कष्टमय करून घेतलें आहे, तर

मध्य आफ्रिका पूर्णपणें शोधण्याची त्याची मनीषा त्याला पुरी करूं द्यावी असें सरकारनें ठरविलें; आणि १८६६ त मध्य आफ्रिकेचा ' कॉन्सल ' म्हणून त्याची नेमणूक करण्यांत आली. मात्र या जागेला पगारवगैरे कांहीं नव्हता !

पैशाची कांहीं जुळवाजुळव करून रुवुमा नदीच्या मुखाकडे तो पुन्हां परत आला. तेथून न्यासा सरोवराच्या दक्षिण टोकाकडे भूमार्गानेंच तो जावयास निघाला. या खेपेस त्याच्याबरोबर कोणीही युरोपियन लोक नव्हतें. प्रवास लांबीचा आणि दगदगीचा असल्यामुळें, बरोबरच्या तद्देशीय लोकांपैकीं बरेच लोक वाटेंत मरण पावले. त्याच्याजवळचे सामानसुमानही पुष्कळसें नष्ट झालें. न्यासा सरोवराच्या नैऋत्य टोकापर्यंत तो आला. तेथून पुढें तो जो पश्चिमेकडे शिरला तो कोठें गेला, हें कोणाला कळेचना.

त्याच्या पथकांतून फुटून किंवा रेंगाळत जे लोक मागें राहिले होते ते सांगूं लागले कीं, अंगोरी झुलू लोकांनीं त्याला केव्हांच मारून टाकलें आहे. अर्थात् लिव्हिंग्स्टन्चा शोध करावा म्हणून लेफ्टनंट एडवर्ड यंग याला आफ्रिकेंत धाडण्यांत आलें. त्यानें दाखवून दिलें कीं, लिव्हिंग्स्टन्च्या वधाची बातमी खोटी आहे. न्यासा सरोवरापासून पश्चिमेकडे जात जात उत्तरेकडे वळून टांगानिका सरोवराच्या दक्षिणेला जाऊन लिव्हिंग्स्टन् पोहोंचला होता. तेथून पुन्हां पश्चिमेकडे वळून, तो वेरु सरोवरावर आला. तेथून लुंडा येथें आल्यानंतर लापुला नदी त्यानें पाहिली. त्याला वाटलें कीं, हाच नाईल नदीचा उगम असावा. पण हें त्याचें अनुमान अगदीं चुकीचें होतें. ही नदी कॉंगो होती हें पुढें त्याला दिसून आलें.

परंतु या वेळीं युरोपांतील लोकांना त्याची वार्ताच लागेनाशी झाल्यामुळें तो मेल्याची किंवा कोठें तरी अडकून पडल्याची बातमी सगळीकडे पसरत चालली. कसेंही करून त्याला हुडकून काढलेंच पाहिजे असें ठरवून न्यूयॉर्क हेरल्डच्या संपादकानें स्टॅन्‌ले याला आफ्रिकेंत पाठवून दिलें. स्टॅनले

हा एक मोठा उमदा माणूस होता. हें साहसाचें काम त्यानें खुषीनें अंगावर घेतलें आणि यांत यश मिळण्याची जरी फारशी आशा नव्हती तरी तो आफ्रिकेच्या किनाऱ्याला गेलाच गेला. त्यानें असें अनुमान केलें कीं, नाईल नदीचा पाणलोट शोधण्याचा लिव्हिंग्स्टन्चा हव्यास होता तर तो **टांगानिका सरोवरावरून** किंवा निदान त्याच्या शेजारून तरी गेला असला पाहिजे. जर गेला असला तर या गोऱ्या प्रवाशाची माहिती तिकडल्या लोकांना खचितच झाली असली पाहिजे. म्हणून या सरोवराकडेच जावें असें स्टॅन्लेनें ठरवलें.

झांझिबार येथील अमेरिकन वकिलाकडून त्यानें उसने पैसे घेतले आणि बरेच तद्देशीय लोक नोकरीला ठेवले. तीन युरोपियन माणसेंही त्याच्याबरोबर होतीं. सर्व सरंजामानिशीं स्टॅन्ले हा किनाऱ्यावरील **बागोमाया** या गांवाहून पश्चिमेकडे निघाला. हा सगळा मार्ग जंगलानें आणि दलदलीनें भरलेला असून त्सी त्सी माशांचा उपद्रव तर तेथें फारच होता. आजाराआजारानें बरोबरचीं घोडीं खेचरें मरून गेलीं. सामान वाहणारे पळून गेले आणि अनेक मदतनीसही दगावले ! तो स्वतः तापानें हैराण झाला. एक आठवडाभर तर असें वाटत होतें कीं, हा जगतो कां मरतो. १८७१ मे ८ रोजीं तो पुन्हां प्रवासाला निघाला.

उसागारा डोंगर ओलांडून तो **उगोगो** नांवाच्या देशांत शिरला. तेथून जातां जातां **उन्यमूवेझी** म्हणजे चंद्रभूमी या देशांत तो गेला. तेथें अरब आणि तत्रस्थ लोक यांच्या भांडणांत तो सापडला. त्यांतून कसाबसा बाहेर पडून तो **मालाग्राझी** या नदीवर येऊन ठेपला.

तेथें त्याला बातमी लागली कीं, एक वयस्कर दाढी वाढलेला गोरा माणूस नुकताच **उजिजी** या गांवीं येऊन पोहोंचला आहे. हें **उजिजी** गांव या टांगानिका सरोवरावरच आहे. नकाशावरून दिसेल कीं, टांगानिका सरोवर दक्षिणोत्तर लांबोळें पसरलें आहे आणि उजिजी गांव

उत्तरेच्या टोंकाकडेच पण पूर्व किनाऱ्यावर आहे. हा म्हातारा माणूस दुसरा तिसरा कोणी नसून लिव्हिंगस्टन्‌च असावा असा अंदाज त्यानें केला.

नदी ओलांडून तो त्या सरोवराच्या उत्तर टोकापाशीं येऊन ठेपला. समुद्र किनारा सोडला त्याला आतां आठ महिने होऊन गेले होते. आणि सगळा प्रवास दलदली, रखरखीत मैदानें आणि झाडी यांतूनच झाला होता. सरोवराचा विस्तार पाहून स्टॅनले आणि त्यांचे सवंगडी आनंदानें नाचूं लागले. ते आतां उजिजीच्या जवळ आले होते. इतक्यांत त्यांच्या तळावर एक भला धिप्पाड काळा आदमी जमलेल्या



गर्दीतून पुढें आला आणि स्टनूलेला म्हणाला, " गुड मॉर्निंग, सर ! "

' त्याच्याकडे पाहून स्टॅन्ले उद्गारला, “ तूं कोण रे बुवा ? तुझ्या मनांत काय आहे ? ” तो काळा माणूस म्हणाला, “ माझें नांव सुसी. मी डॉ. लिव्हिंग्स्टन् यांचा नोकर आहें.”

स्टॅन्ले हा सुसीच्या बरोबर एकदमच गांवांत गेला. तों चव्हाट्यावर एक गर्दी जमलेली दिसली. मान वर करून पाहतों तों एक म्हातारा गोरा माणूस बसला आहे; त्यानें अंगांत तांबड्या फलाणीचें कुडतें घातलें आहे, किरमिजी रंगाची विजार घातली आहे, आणि डोक्याला पिवळ्या पट्ट्याची एक कापडी टोपी घातली आहे, असा देखावा त्याला दिसला. स्टॅन्ले सरळ त्याच्याकडे गेला. डोक्यावरची टोपी काढून त्यानें त्याला सलाम केला आणि तो म्हणाला, “ आपण डॉक्टर लिव्हिंग्स्टन्च आहां असें मी समजतों.” या आपल्या तरुण त्रात्याकडे बघून त्या वृद्ध लिव्हिंग्स्टन्ला गहिंवरून आलें आणि पुढें त्यांच्या संभाषणांत जें स्वारस्य उत्पन्न झालें त्याची नोंद जरी कोणी ठेवलेली नसली तरी दुःखपरिहाराचें सुख आणि प्रतिज्ञा–पूर्तीचा आनंद या संमिश्र भावनांनीं तें भाषण चिंब भिजून गेलें असेल यांत कांहींच शंका नाहीं.

आतां तरी लिव्हिंग्स्टन् युरोपांत परत येईल असें स्टॅन्लेला वाटलें होतें. परंतु लिव्हिंग्स्टन्नें त्याची पूर्ण निराशा केली. मध्य आफ्रिका व **नाईल नदी** यांचा पुरा शोध लावणें हा त्याचा हव्यास होता. म्हणून लिव्हिंग्स्टन् पुन्हां पुढच्या प्रवासाला निघाला.

स्टॅन्लेनें दिलेलें साहित्य बरोबर घेऊन हा वृद्ध गृहस्थ त्याच्या संगतींत **टांगानिका** सरोवराच्या उत्तर टोकापाशीं गेला. तेथून स्टॅन्ले परत फिरला. स्टॅन्लेचें म्हणणें असें होतें कीं, लिव्हिंग्स्टन्नें आपलें काम आतां झालें आहे असें समजावें आणि परत युरोपला चलावें. पण हा महाहट्टी म्हणजे दृढनिश्चयी माणूस त्याला म्हणाला, “ बाबा रे, नाईल नदीचें

उगमस्थान कोठें दडलें आहे तें मी हुडकून काढणारच काढणार. तू आपल्या घरीं जा. मी जिवंत आहें हें तूं पाहिलें आहेस! मी आतां एकटाच या कामाला लागतों.''

दक्षिणेकडच्या **फिबा प्रांतांतून** प्रवास करीत करीत न्यासा, टांगानिका, हे सर्व पठार त्यानें पायाखालीं घातलें आणि शेवटीं तो **बांग्वुलु सरोवराच्या** दक्षिण किनाऱ्यापाशीं आला. **चितांबो** या खेड्यांत राहिलेला असतांना तेथेंच त्याला ताप येऊं लागला. १८७३ च्या एप्रिल महिन्याच्या ३० व्या तारखेस आपलें आयुष्य संपत आलें आहे असे त्याला वाटूं लागलें. तो अंथरूणावरून बाजूला सरला आणि गुडघे टेकून त्यानें परमेश्वराची प्रार्थना केली. सकाळीं ते रानटी नोकर येऊन पाहतात तों निम्मे आफ्रिकाखंड पायतळीं घातलेला आणि परमेश्वराच्या कृतीचें संशोधन करण्यांत जीविताची इतिकर्तव्यता मानणारा डॉ. लिव्हिंग्स्टन् आपलें कलेवर धरणीवर ठेवून निघून गेला आहे, असें त्यांना दिसून आलें.

---

# दक्षिण ध्रुवप्रदेशाचें संशोधन

## १ कॅप्टन कुक् याचें पर्यटण

१७७३ डिसेंबरच्या १२ तारखेला कॅ. कुक् ध्रुव समुद्राच्या आसमंतांत गेला. तेथें त्याला पाण्यावर बर्फ आढळूं लागलें. दोन दिवसांनीं पुढें बर्फाचे खडपेच्या खडपे लागूं लागले. यांतून कुक्चें जहाज तसेंच पुढें पुढें गेलें. वारा अनुकूल होता. वेगानें पुढें गेल्यावर, अनेक लहान लहान बेटें त्यांना लागलीं. पण त्याहीपेक्षां म्हणजे बर्फाचे सुटे खडपे त्यांना अधिकाधिक भेटूं लागले. त्यांना चुकवण्याची कुक्नें पराकाष्ठा केली. परंतु मधून मधून ते त्याच्या जहाजांच्या बरगड्यांवर येऊन आदळत असत. एक खडपा चुकवावा तों दुसरा लागावा असें होऊं लागलें. सगळीकडेच धुकें भरून राहिलें. अर्थात् उत्तरेकडे वळणें आतां भाग आहे असें कुक्ला वाटूं लागलें. २१ तारखेला तर बर्फाच्या खडप्यांचा त्यांच्याभोंवतीं एवढा गराडा पडला कीं, आपण यांतून कसें सुटतों असें कुक्ला होऊन गेलें.

१७७४ च्या जानेवारीच्या शेवटीं एके दिवशीं सकाळीं दक्षिणेच्या बाजूला पांढरे स्वच्छ ढग दिसूं लागले. त्यावरून त्यांनीं अनुमान केलें

कीं, पुढें बर्फाचें मैदानच सुरू होणार असावें. लवकरच ते त्याच्या अगदीं जवळ येऊन ठेपले. उजवीकडे पश्चिमेच्या बाजूला आणि डावीकडे पूर्वेच्या बाजूला हें बर्फाचें मैदान इतकें दूरवर गेलें होतें कीं, तें कोठें संपलें असेल याची कल्पनाही त्यांना होईना. दक्षिणेकडील निम्या क्षितिजावर प्रकाशाचे झोत पडल्यासारखे दिसूं लागले; आणि त्या झोतांत त्यांना बर्फाचे डोंगर स्वच्छ दिसले. लोकांनीं हे डोंगर मोजले तेव्हां ते ९७ भरले. यांतले कांहीं पुष्कळच मोठे होते आणि एकमेकांच्या मागें वर जातां जातां कांहींचीं शिखरें ढगाला जाऊन भिडलेलीं दिसलीं. जवळ जवळचें मैदान बर्फाच्या खडप्यांनींच बनलेलें होतें. पण ते खडपे येवढे मोठे आणि थोड्या अंतराअंतरावरच पण असे गच्च बसले होते कीं, त्यांतून पुढें वाट काढणें सर्वथा अशक्य होतें. दक्षिणेकडील समुद्राकडून खालीं खालीं जाऊन, कदाचित् एकाद्या नव्या भूमीचा शोध लावतां येईल ही कॅप्टन कुक्‌ची आशा या ठिकाणीं विराम पावली. त्यानें आपल्या डायरींत लिहिलें कीं, “ मधून कोठून तरी आणखी दक्षिणेकडे जातां येणें अशक्य होतें असें माझ्यानें म्हणवत नाहीं. परंतु मी तसा गेलों असतों, तर माझ्यावर भलतींच संकटें कोसळलीं असतीं आणि मी वेड्यासारखा वागलों असें ठरलें असतें. माझ्या आधीं नावाडी लोकांनीं जेथपर्यंत रिघाव केला होता त्याच्या पुढें पुष्कळ जावें, येवढीच माझी आकांक्षा नव्हती, तर माणसाला जेथपर्यंत जातां येणें शक्य आहे तेथपर्यंत जाऊन पोहोंचावें असा माझा हेतू होता. परंतु हे बर्फाचे डोंगर माझ्या आड आले आणि मला थोडेसें बरेंही वाटलें. कारण नाहीं तर मी भलत्याच एकाद्या वेडानें झपाटलों असतों आणि दक्षिण ध्रुवाची आशा धरून कोठें तरी गोठून गेलों असतों ! आतां एक इंचभरही दक्षिणेकडे जातां येणें शक्य नव्हतें ” आणि या प्रदेशांत एकादी खंडतुल्य भूमि नाहीं

असें ठरवून त्यानें आपलें सुकाणूं उत्तरेकडे वळविलें. विषुववृत्ताच्या पट्टयांत हिंवाळा घालवावा असें त्यानें ठरविलें. अतिदक्षिणेकडील समुद्र आतां विचारातून सोडून देणेंच भाग होतें. पण दक्षिण अटलांटिक समुद्रांत कांहीं संशोधन करतां येणें शक्य होतें आणि म्हणून तो उत्तरेकडेच वळला.

---

## २ कॅप्टन रॉसचें पर्यटण

कॅप्टन् कुक् याच्यानंतर अनेक लहानमोठ्या नावाड्यांनीं दक्षिण–ध्रुव-प्रदेशांत संशोधनाचें काम केलें. पण त्यांत विशेष ठळक नांव म्हणजे सर जेम्स क्लॉर्क रॉस हें होय. इरेबस आणि टेर्र् अशीं दोन जहाजें यानें तयार केलीं. समुद्रांतल्या बर्फाशीं झुंजावयास योग्य अशींच हीं बनवलेलीं होतीं. रॉसनें आपल्या भ्रमंतीची रचना फार काळजीपूर्वक केली. सर्व तऱ्हेच्या पहिल्या प्रतीच्या सामानाचा पुरवठा त्यानें केला. अवश्य तीं सारीं शास्त्रीय उपकरणें त्यानें बरोबर घेतलीं. तो स्वतः तर केवळ ४० वर्षांचा बांडच होता. उत्तरध्रुव–प्रदेशांत तो सहा वेळां जाऊन आलेला होता; आणि **नॉर्थ मॅग्नेटिक पोलवर** तर तोच पहिल्यानें जाऊन पोहोंचलेला होता. प्रत्येक जहाजावर ७६ माणसें होतीं. एवढ्या सरंजामानिशीं इरेबस आणि टेरर हीं जहाजें १८३९ च्या सप्टेंबर महिन्यांत इंग्लंडांतून निघालीं.

**मदिरा, सेंट हेलिना व केपटाऊन** इकडून जातां जातां रॉस हा तास्मानिया बेटावर पोहोंचला. येथें बरोबरच्या हूकर या शास्त्रज्ञानें बऱ्याचशा नव्या वनस्पति गोळा केल्या. फ्रेंच आणि अमेरिकन् संशोधक या कामींच आपले प्रतिस्पर्धी आहेत हें ओळखून रॉसनें थोडी जलदी केली आणि खिस्तमसच्या सुमारास हीं जहाजें **अन्तार्कतिक्** महासागरांत प्रत्यक्ष शिरलीं.

३० डिसेंबरला रॉसनें पाण्याचा ठाव घेऊन पाहिला; तो सुमारें दोन मैल खोलीचा भरला.

या ठिकाणीं बर्फाचे मोठमोठाले खडपे जहाजांच्या वाटेंत येऊं लागले. लाटा उसळल्या म्हणजे ते उसळून वर येत आणि त्या खालीं गेल्या म्हणजे हे खालीं जात. जहाजांच्या कडांवर हे खडपे धडाधड आपटूं लागले. समोर या खडप्यांची एक मोठी भिंतच बनत आहे, असें दिसलें. रॉसनें थोडें साहस केलें आणि १८४१ जानेवारीच्या पांच तारखेला इरेबस जहाज त्यानें या बर्फाच्या भिंतीवर मुद्दामच नेऊन घातलें. आतां काय होणार म्हणून सगळे चिप् होऊन बसले होते. जहाजाच्या अंगाअंगांतून झिणझिण्या निघाल्या; पण ते बर्फाचे प्रचंड खडपे कड्‌‌ाकड् मोडून पडूं लागले. जहाजाचा दणकाच एवढा जोरानें बसला कीं, समोरची बर्फाची भिंत दुभंगून पडली; आणि मग मधल्या पाण्याच्या फटींतून वेगानें पुढें जाऊन इरेबस जहाज पलिकडल्या भर समुद्रांत जाऊन उभें राहिलें. या समुद्राला **रॉस् समुद्र** असें नांव देण्यांत आलें. याच्या भोंवतालीं असलेली बर्फाची भिंत अशा रीतीनें आजपर्यंत कोणीही फोडली नव्हती.

येथून पुढें दक्षिण ध्रुव प्रदेशांतील मॅगनेटिक पोलकडे रॉसनें आपलीं जहाजें हाकललीं. त्याला वाटलें होतें कीं, आतां आपल्याला सरळ ठोक तिकडे जातां येईल. पण थोडेसें पुढें गेल्यावर, क्षितिजावर उंचउंच दुर्गम पर्वत दिसूं लागले. व्हिक्टोरिया लॅंड या नांवानें माहित झालेल्या प्रदेशाचा हा इशान्य कोपरा होता. या पर्वताला त्यांनीं **सबाईन शिखर** असें नांव दिलें. जवळच एक डोंगराचें काळें भोर कित्येक सहस्र फूट उंच असें नाकाड समुद्रांत शिरलेलें दिसलें. त्याला त्यानें **अडेअर भूशिर** असें नांव दिलें. पुढील पानावर दिलेला नकाशा वाचकांनीं पाहून ठेवला, तरच दक्षिण ध्रुवप्रदेशाच्या संशोधनाची पुढें दिलेली हकीकत त्यांना सुखानें समजेल.


पझेशन बेटे
७२°५
कोलमन बेट
साउथ मग्नेटिक पोल
७४°५
वुड उपसागर
इन् एक्सप्रेसिबल बेट
७६°५
फ्रँकलिन बेट
क्रोझियर भूशिर
७८°५
फेरर ग्लेशिअर
किंग एडवर्ड-
बॅरिअर आईस
फ्रेमहिम
वन टन डेपो
स्कॉट, विल्सन, बावरस मेले-
दि. २९-३-१९१२
ओट्स मेला-
दि. १७-३-१९१२
(सापळा)
८०°५
मारखाम गि.
८२°५
८४°५
८६°५
८८°५
डॉन पेड्रो क्रिस्टोफरसन
स्कॉट १८ जाने १९१२
अमुंडसेन १४-१७ डिसेंबर १९११
दक्षिण ध्रुव

या पर्वताची उंची १०,००० फूट असून याच्या पलीकडे नैर्ऋत्येच्या बाजूला हजारों मैलावर मॅग्नेटिक पोल होता. लवकरच ते एका वैराण बेटाला येऊन लागले. तेथें त्यांनीं इंग्लंडचें निशाण रोवलें. त्यांचा प्रवास दक्षिणेच्या रोखानेंच चालला होता. शेजारचा पर्वत अधिकाधिक उंच दिसूं लागला. या भूमीला त्यांनीं **व्हिक्टोरिया लॅन्ड** असें नांव दिलें; आणि जवळच्याच एका बेटाला **कोलमन बेट** हें नांव दिलें. कोलमन हें रॉसच्या वाङ्निश्चित पत्नीच्या बापाचें नांव होतें.

१८४१ च्या जानेवारी २२ ला आतांपर्यंत, लोक या बाजूला गेले होते ती मर्यादा ओलांडून रॉस पुढें गेला आणि मॅग्नेटिक पोल येथून २५० मैलावर राहिला आहे असें त्याला दिसून आलें. जवळच लागलेल्या एका बेटाला **फ्रँकलिन बेट** असें नांव त्यानें दिलें आणि दूर अंतरावर धुराचे लोट तोंडातून सोडत असलेल्या एका उंच पर्वताला **माऊंट इरेबस** असें नांव दिलें. या भूमीला वळसा घालावा म्हणून रॉस पूर्वेच्या रोखानें चालला होता. पण पुढें त्याला दिसून आलें कीं, या भूमीच्या टोंकाला लागूनच बर्फाची एक प्रचंड दरड चालूं झाली आहे. या ठिकाणाला **केप क्रोझिअर** असें नांव त्यानें दिलें. या दरडीच्या कांठाकांठानें २५० मैल पुढें गेल्यावर रॉस हा जलदीनें परत व्हिक्टोरिया लॅन्डकडे परत आला. जवळच्याच एका उपसागराला **मॅक् मुर्डो** असें नांव त्यानें दिलें. इतकें करून १८४१ एप्रिलच्या ६ तारखेला रॉस हा तास्मानियांत परत आला. त्याच्या या भ्रमन्तीची फलश्रुति ही कीं, दक्षिणध्रुव प्रदेशांत एक खंडरूप भूमि आहे हा शोध पहिल्यानें लागला. बर्फाच्या भिंतीला आणि खडप्यांना बिचकून कुकनें असा निर्वाळा दिला होता कीं, या प्रदेशात खंडतुल्य एकादी भूमि नाहीं. हा त्याचा निर्वाळा रॉस यानें खोटा ठरविला.

आणि त्याची ही तिसरी स्वारी तर अगदींच फसली. पण रॉसूचें नांव संशोधनाच्या इतिहासांत कायम राहिलें आहे तें अशासाठीं कीं, पहिल्या भ्रमन्तींत त्यानें दक्षिण ध्रुवप्रदेशांतील एका नव्या खंडाचा शोध लावला.

---

## ३ ऑॅट्रियन डी जर्लेचीचें पर्यटण

ऑॅट्रियन डी जर्लेची हा एक मोठा हुषार व साहसी दर्यावर्दी होता. बेल्जम देशानें दाक्षिण ध्रुवप्रदेशाचें संशोधन करण्यासाठीं एक स्वतंत्र योजना करावी अशी चळवळ त्यानें केली. सरकारनें त्याला थोडेबहुत पैसे दिले. परंतु शेवटीं जर्लेची याला सारी जमवाजमव खाजगी रीत्याच करावी लागली. याच्या पथकांत कांहीं शास्त्रज्ञ सामील झाले; आणि कांहीं नाणावलेले खलाशीही आपण होऊन आले. जर्लेचीचा मुख्य उद्देश हा होता कीं, दक्षिण ध्रुवप्रदेशांत जरी जावयाचें असलें तरी केवळ प्रदेशाच्या संशोधनांत न गुंततां या प्रयत्नाचें रूप शास्त्रीय ठेवावें; आणि ग्रॅहॅम लॅन्ड या नांवानें आतां माहित झालेल्या भूमीवर जाऊन हें संशोधन करावें.

बेल्जिका नांवाचें एक लहानसें जहाज त्यानें सज्ज केलें. कॅप्टन् लेकॉइन् हा जहाजाचा मुख्य नाखवा होता. रोल्ड अमुंडसेन या नांवाचा दुसरा एक नाविक अधिकारी होता. १८९७ ऑगस्ट महिन्याच्या १६ तारखेला बेल्जिका जहाज अँटवर्पहून निघालें. टेराडेल फ्यूगो या नांवाचीं दक्षिण अमेरिकेच्या दाक्षिण टोकाला जीं पुष्कळ लहानशीं बेटें आहेत, तेथें बेल्जिका जहाजानें बराचसा मुक्काम केला. कारण या बेटा-वरील रानटी लोकांच्या चरित्राचा अभ्यास करावा, असें जहाजावरील संशोधकांनीं ठरविलेलें होतें. परंतु एकीकडे हा अभ्यास चालू असतां या

जहाजावर भलतेंच संकट ओढवलें ! पाण्याच्या पोटांतील एका खडप्यांत हें जहाज गुंतून पडलें आणि समुद्राच्या ओहटीलाही सुरवात झाली. उघडें पडतां पडतां हें जहाज पूर्णपणें उघडें पडलें. इतक्यांत एक मोठें वादळ सुरू झालें आणि त्याच्या जोरानें शेजारच्या खडकावर तें थाड् थाड् आपटूं लागलें. पण या वादळाच्या मागोमाग पाण्याची एक प्रचंड लाट आली आणि जहाज खडकांतून मोकळें होऊन पुन्हां समुद्रांत शिरलें.

१८९८ च्या जानेवारीच्या शेवटीं शेवटीं, जर्लेची हा **पामरलॅन्डच्या** दक्षिण टोंकास जाऊन पोहोंचला आणि **ऑर्लिन्स चॅनल** या आखातांतून पुढें गेला. तो पुढें गेला तों पुन्हां बेल्जिका नाव कांठावर जाऊन रुतली. सुदैवानें पुन्हां वारा, पाणी अनुकूल झालें आणि ती चालूं लागली. जें आखात आहे असें वाटत होतें ती सामुद्रधुनी आहे असें त्याच्या ध्यानांत आलें ! उजव्या बाजूला **पामरलॅन्ड**वर काळेभोर प्रचंड पर्वत लागलेले होते; आणि डाव्या बाजूला **ग्रॅहॅम भूमि** पसरलेली होती. या दोहोंच्या मधून बेल्जिका नौका जाऊं लागली. पर्वताचीं पांढरी शुभ्र माथीं वर जातां जातां ढगांना जाऊन मिळालीं होतीं आणि त्यांच्या उतरणीवरून मोठाल्या हिमनद्या खालीं सरकत येत होत्या. डाव्या हातच्या भूमीवर मात्र झाड-झुडुप, गवत कांहीं नव्हतें. इतक्यांत जोराचा वारा सुटला आणि विंकी या नांवाचा एक खलाशी पाण्यांत पडून मरण पावला. थोड्या अंतरावर पुढें लागलेल्या एका बेटाला बेल्जिकेच्या कप्तानानें **विंकीबेट** हें नांव दिलें.

ही सफर संशोधनासाठीं व्हावयाची होती; म्हणून या सामुद्रधुनीच्या कांठांवर ही मंडळी अठरा ठिकाणीं उतरलीं. त्यांनीं ठिकठिकाणचे नकाशे तयार केले. जातां जातां बेल्जिका नौका पॅसिफिक महासागरांत शिरली. जर्लेचीच्या मनांत असें होतें कीं, **ग्रॅहॅम लॅन्डच्या** पलीकडे असलेल्या बर्फांत ही नौका जोरानें नेऊन घालावी. परंतु ८५ मेरिडियनला पोहोंचेपर्यंत

हें साधणार नाहीं, असें त्याला दिसून आलें. मार्च महिन्याच्या दुसऱ्या तारखेस बेल्जिकेच्या भोंवतीं बर्फाचे खडपे जमूं लागले. त्यांच्या मध्यावर बेल्जिका गच्च होऊन बसली व भोंवतालचे बर्फाचे खडपे एकमेकांना मिळाले. नौका जरी थोडीशी हलली डोलली तरी भोंवतालीं जिकडे तिकडे बर्फाचें मैदानच बनून गेलें.

आतां पुढें काय वाढून ठेवलें आहे हें कप्तानाला चक्क दिसून आलें. अन्तार्कतिक् प्रदेशांतील हिंवाळा अगदीं नजिक आला होता. या हिंवाळ्यांत तेथें सूर्य क्षितिजाच्यावर केव्हांही दिसत नाहीं. १७ मार्चला सूर्य दिसेनासा झाला. आपण अशा तऱ्हेच्या कचाट्यांत सापडूं असें या लोकांना केव्हांच वाटलें नव्हतें. अर्थातच अशा प्रसंगाला तोंड देण्याची त्यांनी कांहीं तयारीही केली नव्हती. मधून मधून आकाशांतून बर्फाचा वर्षाव होऊं लागला. जहाज अधिकाधिकच खचत खालीं जाऊं लागलें. खलाशांनीं कुदळीं, फावडीं हातांत घेऊन शेजारचें बर्फ थोडें खणून काढावें व जहाज थोडें तरी हलतें ठेवावें असा यत्न करून पाहिला. परंतु वरून पडणाऱ्या बर्फापुढें त्यांचें फारसें कांहीं चाललें नाहीं.

आतां चार पांच महिने या ध्रुवप्रदेशांतील रात्रींतून सुटका नाहीं हें ओळखून सर्वजण एकमेकांची समजूत घालूं लागले आणि ज्याला जें करतां येण्यासारखें होतें तो तें करूं लागला. डँको या पदार्थविज्ञान शास्त्रज्ञानें त्या बर्फाच्या मैदानांतच एक झोंपडी घातली आणि आपलीं संशोधनाचीं साधनें हातीं घेऊन भोंवतालच्या प्रदेशाचें त्यानें फार बारीक निरीक्षण केलें. चोहोंकडे तमिस्त्र पसरलेलें, ताज्या अन्नाचा एक कणही मिळावयाचा नाहीं आणि दिवसरात्रीची उघडझांप न होतां एकच देखावा डोळ्यांपुढें सारखा दिसत असलेला, यामुळें हा डँको आजारी पडला आणि जूनच्या ५ तारखेला मरून गेला.

नौकेवरील सर्वच लोकांना अगदीं नकोसें झालें. काय करावें आणि काय बोलावें हेंच कोणाला सुचेना. नित्य उठून तींच माणसें आणि तोच देखावा! शेवटीं शेवटीं तर या लोकांना वेड लागण्याची पाळी आली! एका माणसाला तर प्रत्यक्ष वेड लागलेंच आणि दुसरा अर्धवट वेडा झाला. तोच तोच देखावा सारखा पाहून या लोकांना घाबरल्यासारखें होऊं लागलें. करमणूक म्हणून पैसे लावून ते पत्ते खेळूं लागले. दहा दहा हजार पौंडाच्या रकमा ते पणाला लावूं लागले! अर्थात् सर्वांनाच माहित असें कीं डाव हरला तरी कोणी देणार नाहीं आणि कोणी घेणार नाहीं! पत्ते संपले म्हणजे झोंपा काढाव्या. बारा बारा तास निजावें असेंही त्यांनीं करून पाहिलें. परंतु आलेला कंटाळा आणि उद्वेग मुळींच जाईनात. जे लोक फारच जिकीरीला आले त्यांना डॉ. कुक् हा धगधगणाऱ्या निखाऱ्यापाशीं उभें करी. यामुळें त्यांना थोडेसें बरें वाटे. जुलै २३ पर्यंत हा प्रकार चाललेला होता. त्या दिवशीं सूर्याचें बिंब क्षितिजावर पुन्हां दिसलें.

कदाचित् आनंदाच्या भरांतच कोणीसें ठरविलें कीं, घसरगाडींत बसून बर्फावरून लांबवर जाऊन यावें. लेकॉइन्, अंमुडसेन आणि कुक् हे तिघे जहाजांतून बाहेर पडले. बरोबर एक तंबू, एक कापड-खोली, आणि पंधरा दिवस पुरेल इतकें अन्न असें सामान त्यांनीं घेतलें होतें. पण मैदानावरून कांहींसे पुढें जातात तों बर्फाचे खडपे डळमळूं लागले; आणि दोन खडप्यांच्या मधल्या फटींत त्यांची घसरगाडी सापडली! कशीबशी धडपड करून ते जिवानिशीं सुटले आणि एक आठवड्यानें जहाजावर परत आले.

सप्टेंबर महिना आला आणि हवेंत पुष्कळच उबारा वाटूं लागला. तथापि भोंवतालचे बर्फाचे खडपे फुटून पाणी मोकळें होईल असें दिसेना.



तें झालें नाहीं तर, तेथेंच कायमचें अडकून पडूं, अशी भीति त्यांना वाटूं लागली. डिसेंबर महिना आला तरी ते खडपे फुटेनात किंवा वितळेनात; असेच आणखी दोन तीन महिने गेले म्हणजे पुन्हां पुढला हिंवाळा येईल. चार महिन्यांची रात्र तेथें पुन्हां कंठावी लागेल, असें कप्तानाला वाटूं लागलें. म्हणून बर्फ फोडण्याच्या उद्योगाला ते लागले. त्यांनीं बर्फाला मोठमोठाले सुरुंग लावले.जहाजापासून पांचशें यार्ड अंतरावर त्यांनीं बर्फाला १० फूट खोलीचें भोंक पाडलें आणि त्यांत डायनामाइट घालून धडाका

उडवून दिला. महाप्रचंड गडगडाट झाला आणि बर्फ व पाणी १६० फूट उंच उसळलें! पण इतकें झालें तरी भोंवतालच्या बर्फाच्या तटकाला कोठेंही तडा गेला नाहीं कीं साधी चीरसुद्धां पडली नाहीं!

पण आतां काय वाटेल तें करून एक मैल दूर असलेल्या पाण्यापर्यंत चर खणीत नेणें हें अवश्यच होतें. नाहींतर सूर्य पुन्हां नाहींसा होणार आणि सार्‍यांना खात्रीनें वेड लागणार असें दिसूं लागलें. इतक्यांत, बर्फाच्या पृष्ठांत लहानशी खांच दिसूं लागली आणि तेथें बर्फाचा थर पांच सहा फूटच खोल आहे असें त्यांना आढळून आलें. तेथूनच त्यांनीं खणावयास आरंभ केला. खणतीचें काम रात्रंदिवस करूनही हा चर फक्त २३०० फूट लांब खणतां आला. अजून किती तरी मैदान पुढें शिल्लक होतें. तें पाहून त्यांच्या पोटांत धस्स होऊं लागलें. तोंच मानवी प्रयत्न म्हणजे काय आणि सृष्टीची शक्ति म्हणजे काय याचा त्यांना प्रत्यय आला. प्रचंड वादळ एकाएकीं सुरू झालें आणि तें सारें बर्फाचें मैदान काड् काड् आवाज करीत साफ मोडून गेलें. बेल्जिका नौका एकदमच पाण्यावर चालूं लागली. जरी एकादा एकादा खडपा तिला त्रास देत होता तरी नाखव्यानें मोठ्या कौशल्यानें तिला भर समुद्रांत नेऊन सोडलें.

---

# ४ स्कॉटची पहिली सफर

इ. स. १९०० च्या जून महिन्यांत स्कॉटची नेमणूक कमांडरच्या जागीं झाली. सर क्लेमंडज् मारख्यॅम् यानें स्कॉटला सांगितलें होतें कीं, या सफरीचें पुढारीपण आपणाकडे असावें असा आग्रह तूं धर. जर मारख्यॅम् याच्या मनांत ही सफर निघावयाची आहे तर ती निघणारच हें

स्कॉटला कळून चुकलें. कारण मारख्यॅमनें पैशाची पुष्कळच जुळवाजुळव केलेली होती. लिवेलियन लॉंग् स्टार या नांवाच्या गृहस्थानें २५००० पौंड दिले आणि बालफोर्नें जाहीर केलें कीं, लोक खाजगी रीतीनें जितके पैसे जमवतील तितके पैसे त्यांना सरकारांतून मिळतील. अशा प्रकारें ९२००० पौंडांची रक्कम जमा झाली आणि डिस्कव्हरी हें जहाज तयार झालें. आरमारांतून स्कॉटला रजा देण्यांत आली. बरोबर नेण्यासाठीं त्यानें सरकारी आरमारांतूनच अनेक खलाशांची निवड केली. हे खलाशी जलप्रवासाला चांगले खंबीर बनलेले आणि साहसी होते. यांच्या जोडीला एक शास्त्रज्ञांचें पथकही त्यानें बरोबर घेतलें. पण प्रत्यक्ष जहाज हांकारण्यापूर्वी तो नॉर्वे देशांत गेला आणि डॉ. नान्सेन् या उत्तर-ध्रुव संशोधकाचा त्यानें सल्ला घेतला. ध्रुवप्रदेशांत प्रवास कसा करावा या संबंधीचा आपला सारा अनुभव नानसेन् यानें स्कॉट्ला कथन केला; आणि १९०१ च्या उन्हाळयांत ‘ डिस्कव्हरी ’ जहाज निघालें.

स्कॉट तडक दक्षिण ध्रुवाकडेच निघाला आणि त्यानें साऊथ व्हिक्टोरिया लॅन्ड या प्रदेशाचें निरीक्षण केलें. पुढें एक नवी भूमि लागली. तिला त्यानें ‘ एडवर्ड दी सेव्हन्थ् लॅन्ड ’ म्हणजे सातव्या एडवर्डची भूमि असें नांव दिलें. त्याच्यापुढें जाऊन रॉस समुद्र किती खोल आहे हें त्यानें ठाव घेऊन पाहिलें. जी बर्फाची प्रचंड दरड म्हणून आतांपर्यंत संशोधकांनीं पाहिली होती ती कसली आहे हेंही त्यानें तपासून पाहिलें. तीन वर्षें आणि तीन महिने इकडल्या टापूंत घालवून १९०४ च्या सप्टेंबर महिन्यांत स्कॉट परत आला. इंग्लंडच्या लोकांनीं त्याचा मोठाच जयजयकार केला. इतर देशच्या लोकांनींही आणि विशेषतः भूगोल-संशोधक-समितिनें त्याला निरनिराळया पदव्या आणि पदकें देऊन त्याचा गौरव केला.

डिसेंबरच्या २३ तारखेला स्कॉट्नें लिटल्टन् बंदर सोडलें. डिसकव्हरी जहाज सामानसुमानानें इतकें लादलें होतें कीं, तें बुडणार नाहीं ना, येवढीच काय ती दक्षता कप्तानानें ठेवली आहे, असें वाटावें. कोळसा आणि मोठमोठाल्या झोंपड्या बांधावयास लागणारें लांकूड मिळून ३३० टनांचा बोजा जहाजावर होता. शिवाय २३ कुत्रीं आणि ४५ बकरीं होतीं. जानेवारी ८ च्या सुमाराला डिसकव्हरी जहाज रॉस समुद्राला जाऊन पोहोंचलें. केप् अडेलपासून पुढें गेल्यावर तें पाण्याच्या धारेला लागलें; आणि नाखव्यानें जरीं सारीं इंजिनें पेटवलीं तरी त्याला तें जहाज त्या धारेंतून बाहेर काढतां येईना. प्रहर दोन प्रहर झटापट केल्यानंतर डिसकव्हरी जहाज या धारेंतून मोठ्या शर्थीनें बाहेर पडलें. कोलमेन बेटावर येतात तोंच जणूं कांहीं त्यांच्या स्वागतासाठींच एक जंगी तुफान अन्तार्कतिक् समुद्रानें पाठवून दिलें ! अर्थात् हें स्वागत सहन होण्यासारखें नव्हतें. म्हणून डिसकव्हरी जहाज पलीकडे दोन हजार फूट उंच असलेल्या प्रचंड सुळक्यांच्या आश्रयाला जाऊन उभें राहिलें. पण तुफानाचा जोर असा होता कीं, डिसकव्हरीच्या इंजिनांचें त्याच्यापुढें कांहीं चालेना. सगळी रात्र धक्के खाण्यांतच निघून गेली. सकाळ झाल्यावर वारा पडला आणि जहाज क्रोझियर भूशिरापाशीं जाऊन पोहोंचलें.

फेब्रुआरी महिन्याच्या शेवटपर्यंत आपल्याला पाण्यांत हिंडता येईल, हें पाहून, आइस बॅरिअर म्हणजे बर्फाची प्रचंड दरड—तिच्या कांठाकांठानें स्काट्नें आपलें जहाज हाकारलें; आणि रॉस गेला होता त्याच्याही पुढें तो गेला. तेथून पुढें एक नवेंच बेट दिसूं लागलें. या उंच खडप्याला त्यानें आपल्या राजाचें म्हणजे सातव्या एडवर्डचें नांव दिलें. तेथून तो परत फिरला. कारण पुढें मोठमोठे बर्फाचे सुळके आहेत असें दिसूं लागलें आणि जहाजाच्या अंगावर समोरून बर्फाचे प्रचंड खडपे येऊं

लागले. एका खडप्यानें तर डिसकव्हरी जहाजाला अशी जोराची धडक दिली कीं, सारें जहाज अंगा-अंगांतून करकरूं लागलें; आणि सगळीं माणसें भयभीत होऊन एकमेकांकडे पाहूं लागलीं.

दुसरे दिवशीं म्हणजे फेब्रुआरी ४ ला ही बर्फाची डगर म्हणजे आहे तरी काय हें उंचावरून पहावें म्हणून स्कॉट्, शॅकलटन् इत्यादिकांनीं छोट्याशा विमानांतून वर उड्डाण केलें. इव्हा नांवाच्या एका बलूनमध्यें बसून ते झपाट्यानें वर गेले. ८०० फूट उंचीवर गेल्यावर त्यांना दिसून आलें कीं, ही बर्फाची दरड फार दूरपर्यंत आंतवर गेलेली आहे; आणि तिच्या या वरच्या पृष्ठावर बर्फाचे उंचसखल ढीग लागलेले आहेत. स्कॉट्नें केलेलें हें एक मोठें साहसच होतें. पण तें केल्यानें बॅरिअरच्या वरील स्वरूपाचें थोडेंबहुत तरी ज्ञान त्याला झालें.

आतां लवकरच दक्षिणध्रुवाकडील रात्र सुरूं होणार होती; म्हणून एक सोयीस्कर जागा पाहणें अवश्य होतें. रॉस बेटाच्या दक्षिण टोंकावर ही जागा स्कॉट्नें कायम केली. तेथून निरनिराळ्या शास्त्रीय शोधांसाठीं बरोबरचे तज्ञ निरनिराळ्या दिशांना गेले; आणि पृथ्वीच्या आकर्षणशक्ती-विषयींचीं कांहीं अनुमानें त्यांनीं बांधलीं. पण संशोधनाच्या मानानें त्यांना संकटें मात्र फार सोसावीं लागलीं. एकादादुसरा मनुष्य या कामीं गमावलाही. एप्रिलच्या २० तारखेला सूर्यदर्शन बंद पडलें. या दिवशीं सूर्य जो एकदां मावळला, तो चार महिने पुन्हां उगवलाच नाहीं. या प्रदीर्घ काळांत मोठे भयंकर वादळी वारे वहात राहिले. जहाजापासून फार दूरवर कोठें जाणें अगदीं धोक्याचें होतें. स्केल्टन आणि बर्नाकी हे दोघे जहाज सोडून थोडेसे बाहेर गेले होते. वादळाच्या झपाट्यांत सांपड-ल्यामुळें आपण कोठें आहोंत हेंच त्यांना कळेना. वादळ जरा शांत झाल्यावर ते पाहतात, तों डिसकव्हरी जहाज अर्ध्या हाकेवर सुद्धां नाहीं असें

त्यांना दिसून आलें. मे महिन्यांत सुटलेलें एक वादळ अशा वेगानें चालून आलें कीं, जहाजावरची पवनचक्की कोलमडून पडली. अर्थात् यामुळें विजेचे दिवे बंद पडले. धुराडीं उडून गेल्यामुळें जहाजावरील खोल्यांत जिकडे तिकडे धूर भरून राहिला. तथापि जहाजावरील लोकांनीं शिस्त म्हणून कधीं सोडली नाहीं. शाकल्टन् यानें करमणुकीसाठीं एक वर्तमानपत्र सुरूं केलें. टाईप जुळवणें, छापणें, संपादणें हीं सारीं कामें तो एकटाच करी. या पत्राचें नांव ‘ दि साऊथ पोलर टाईम्स ’ असें होतें. पहिल्याच अंकांत त्यानें इतका नाना प्रकारचा मजकूर दिला आणि पत्र इतकें लोकप्रिय झालें कीं, दुसऱ्या एका हौशी संपादकानें ‘ ब्लीझर्ड ’ म्हणजे वादळ या नांवाचें आणखी एक वर्तमानपत्र सुरूं केलें. पण यांचें नांव ‘ वादळ ’ हेंच असल्यामुळें तें एका अंकापुरतेंच टिकलें !

२३ जूनला त्यांनीं ख्रिसमस्‌चा सण साजरा केला ! त्या दिवशीं सर्वांना एक एक पेला जास्त दारू देण्यांत आली. अंमलदार लोकांनीं आपल्या चांदीच्या ताटवाट्या बाहेर काढल्या आणि नाना प्रकारच्या पक्कान्नांची केवळ लयलूट करून घेतली. घसरगाड्यांतून आसपास फिरावयास जाण्याचें प्रयोगही झाले. बरोबर कांहीं दिवस पुरतील एवढीं खाद्यपेयें घेऊन ज्यांना ज्या बाजूला जावेसें वाटलें तिकडे ते गेले.

एका तुकडीचें पुढारीपण स्कॉट् याच्याकडे होतें. या तुकडींत वानें आणि शॅकलटन् हे दोन ठळक लोक होते. सप्टेंबर १७ ला १३ कुत्रीं आणि पंधरा दिवसांना पुरेल इतकें अन्न बरोबर घेऊन ही मंडळी जहाजां-तून बाहेर पडली. पहिल्या मुक्कामांतच स्कॉट्‌ची अगदीं धांदल उडाली. वाऱ्याच्या सोसाट्यांत तो सांपडला आणि तंबूंतून कोणीकडे तरी हेल-पाटत गेला. शेवटीं सर्वजण कसे तरी एकत्र आले. त्यांनीं तंबू दाबून धरला.

बार्नेची बोटें थंडीनें फुटूं लागली आणि निभत नाहीं, असें पाहून दुसरें दिवशीं हे तिघेजण जहाजाकडे परत आले.

इतक्यांत जहाजावर स्कर्व्ही नांवाचा रोग सुरू झाला. या रोगानें हातपाय सुजूं लागतात आणि हिरव्या काळ्या पडतात. होतां होतां शेवटीं माणूस दगावतो. पण जर ताजें अन्न आणि पालेभाज्या खावयास मिळाल्या तर हा रोग बरा होतो. डिसकव्हरी जहाजावरील माणसांची आणखी एक तुकडी हिमनदी चढून पांचशें फूट वर गेलेली होती. पण तेथें या तुकडींतील लोकांना स्कर्व्ही रोग होऊं लागला; म्हणून तेही परत फिरले. स्कॉट्नें ताबडतोब जंतुघ्न रसायनांचा जहाजावर सडा घातला आणि एक घसरगाडी दूरवर पाठवून ताजे सील मासे पकडून आणले. त्याचप्रमाणें डॉ. कोलिन्स यानें मस्टार्ड बियांची पेरणी लिनन् कापडावर केली.यांतून थोडासा हिरवा पाला हाताशीं लागला. सील माशाचें ताजें मांस आणि हा पाला खावयास मिळाल्यामुळें रोगी लोकांची स्कर्व्ही पुष्कळच कमी झाली.

ऑक्टोबर ३०ला दोन्ही तुकड्या पुन्हां दक्षिणेकडे निघाल्या. ७९° अक्षांशावर पोहोंचल्यावर—कारण येथपर्यंत अजून कोणी गेलेंच नव्हतें—तुकडींतील निम्मे लोक परत फिरले आणि स्कॉट् व त्याचे दोघे मित्र हे दक्षिणेच्या रोखानें पुढें गेले. भोंवतालीं बर्फाची ती अवाढव्य दरड पसरलेली होती. थंडीनें त्यांचे ओठ आणि नाकें अगदीं फुटून गेलीं आणि पुन्हां पुन्हां त्यांना हिमान्ध्य—म्हणजे बर्फाकडे पाहून पाहून आलेलें आंधळेपण—येऊं लागलें. त्याच्यावरचें झिंक सल्फेट हें औषध त्यांनीं जवळच ठेविलेलें होतें. पण तें एकदां डोळ्यांत घातलें म्हणजे झोंबून झोंबून त्यांना जीव नकोसा होई. दोन्ही वेळां अन्न शिजवावें तर तेल जास्त खर्च होतें; म्हणून दिवसांतून एकदां शिळेंच खावयाचें त्यांनीं ठरविलें. एकदां तर एका

कुत्र्यानें यांचा डोळा चुकवून आठ दिवसाचें सील मांस एकदमच खाऊन टाकलें ! या प्रवासांत एक मैल रुंद आणि शंभर फूट खोल अशी एक भयंकर घळ त्यांना लागली. ते याही घळींत शिरले. शेवटीं दक्षिणेच्या बाजूनें खालीं जातां जातां घळ मोकळी होत आहे असें त्यांना दिसलें. बर्फाची दरड मात्र कोणच्याही अंगाला संपेल असें दिसेना.

शॅकल्टन् याच्या हिरड्या पुन्हां सुजूं लागल्या आणि एके दिवशीं तर तिघांनाही एकदमच हिमान्ध्य प्राप्त झालें. तथापि तें तात्पुरतें असतें हें ध्यानांत हवें. वास्तविक पाहतां पुढें पाऊल टाकणें आतां धोक्याचें होतें; पण काय वाटेल तें झालें तरी शेवटाला जाऊन पोहोंचावयाचें असा निर्धार त्यांनीं केलेला होता. सव्वीस तारखेला एक डोंगराचा सुंदर सुळका त्यांना दिसला. त्याला त्यांनीं **लॉंग स्टाफ डोंगर** असें नांव दिलें. आणि दुसरा एक डोंगर दिसला त्याला **मारख्याम डोंगर** असें नांव दिलें. या दोन तीन दिवसांत विल्सन हा फार आंधळा झाला होता. तो फक्त गाडी ओढण्याचें काम करीत असे !

आतां ते ८२° अक्षांशाच्या पुढें गेले होते. तथापि हरहुन्नर करीत जानेवारी ७ पर्यंत ते तसेच पुढें गेले. आतां मात्र जवळचें अन्न संपुष्टांत येऊं लागलें. मधून मधून कुत्रीं मारून खाण्याचें काम चाललेंच होतें. शॅकल्टनच्या दातांतोंडांतून रक्त येऊं लागलें. २८ तारखेला आगाऊ केलेल्या एका मकाणावर ते येऊन पोहोंचले आणि स्कॉटसकट सगळ्या लोकांनीं येथें इतकें खाल्लें कीं, झोंप येईना म्हणून रात्रीच्या वेळीं त्यांना तंबूच्या भोंवतीं फेऱ्या घालीत राहावें लागलें !

इतक्यांत इंग्लंडहून मॉर्निंग नांवाचें एक मदतनीस जहाज येऊन पोहों-चलें आणि तें मॅक्मर्डो उपसागरांत येऊन उभें राहिलें. डिसकव्हरी जहाज अजून बर्फांतच अडकून पडलें होतें. तें जहाज सोडून देऊन सर्वांनीं

मॉर्निंग जहाजावर यावें असें आतां लोकांना वाटूं लागलें. कारण फेब्रुवारी महिना गेला तरी रुतलेलें डिसकव्हरी जहाज जागचें बिलकूल हलेना. शेवटीं या दक्षिणध्रुव प्रदेशांतील आणखी एक रात्र तेथें घालवावयाची तयारी ज्या आठ लोकांनीं दाखवली ते तेथें राहिले आणि बाकीची सारी मंडळी मॉर्निंग जहाजाकडे परत फिरली. या आठ लोकांतील प्रमुख स्कॉट हा होता. मॉर्निंग जहाजाच्या कप्तानानें बरोबर आणलेला ताज्या अन्नाचा प्रचंड सांठा आणि थोडासा कोळसा स्कॉटच्या हवालीं केला आणि तो निघून गेला. खूप ताजें मांस खावयास सांपडल्यामुळें ध्रुव प्रदेशांतील हे निशाचर लोक जवळ जवळ निरोगी राहिले.

१२ ऑक्टोबरला स्कॉटनें आपला प्रवास पुन्हां सुरू केला. आतां ते एका विशाल हिमनदीवरून पुढें जाऊं लागले. पण वारा इतका सोंसाट्याचा सुटला कीं, बरोबरचें सामान जवळ राहीच ना. कांहीं कांहीं सामान त्यांनीं खालीं ठेवलें. तें तर वाऱ्यानें कोठल्या कोठें उडून गेलें. यांतच अक्षांश रेखांशांचें केलेलें कोष्टक आणि 'प्रवाशांना सूचना' या नांवाची लिहिलेली पुस्तिका हीही उडून गेली. कांहीं थोडा प्रवास झाल्यावर बर्फाच्या पृष्ठाला अंथांग खोल तडे गेले आहेत असें दिसूं लागलें. म्हणून त्यांनीं आपल्या सरकगाड्या बाजूला वळवल्या आणि मुक्काम करावयास टणक बर्फ कोठें सांपडतें याचा शोध त्यांनीं चालूं केला. तें सांपडतांच त्यांनीं आपला तंबू उभा केला. पण वाऱ्यानें तो पुन्हां पुन्हा आपटूं लागला. शेवटीं त्या फडफडणाऱ्या कॅनव्हसच्या आड बसून त्यांनीं चूल पेटवली आणि अन्न कढत करून खाल्लें. १० नोव्हेंबरच्या सुमारास या सर्वांनाच हा प्रवास आतां दुःसह आहे असें वाटूं लागलें. शेवटीं सर्वजण परत फिरले. परतीच्या वाटेचीं संकटें पूर्वींच्यापेक्षांही भयंकर होतीं. एकदां तर ते सारेजण बर्फाच्या एका मोठ्या खबदाडांत कोसळले. यानें

त्याला धरावें व त्यानें याला ओढावें, अशी झटापट बराच वेळ झाल्यावर ते एकदाचे त्या खबदाडाच्या वर येऊन पोहोंचले. शेवटीं १०९८ मैलांचा हा प्रवास संपवून ही मंडळी डिसकव्हरी जहाजापाशीं येऊन पोहोंचली. या प्रवासांतच जवळजवळ २०,००० फूट उंचीची चढण त्यांना चढावी लागली होती. अजून डिसकव्हरी जहाज तसेंच बर्फांत रुतून पडलेलें होतें. थोडी विश्रान्ति घेतल्यावर बर्फ करवतून काढण्याचें काम त्यांनीं सुरूं केलें. पण हा प्रयत्न निष्फळ आहे असें पाहून, सृष्टिव्यापारानेंच आतां मोकळीक झाली तर होईल अशा विचारानें ते गप्प बसून राहिले.

५ जानेवारीला मॉर्नींग आणि टेरानोव्हा अशीं दोन मदतनीस जहाजें इंग्लंडांतून पुन्हां आलीं. त्यांच्याबरोबर स्कॉटला हुकूम आला होता कीं, डिसकव्हरी जहाज जर बर्फांतून हलत नसलें तर तें बेलाशक टाकून द्यावें आणि परत फिरावें. पण या जहाजासंबंधानें त्या सर्वांना भारीच आपलेपणा उत्पन्न झालेला होता. म्हणून बर्फाचे खडपे डायनॅमिटनें उडवण्याचा यत्न त्यांनीं करून पाहिला. तरीही कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहून सारी मंडळी या मदतनीस जहाजांवर आली. महिना सव्वा महिना त्यांनीं वाट पाहिली आणि मग सृष्टीची लहर फिरली! बर्फाचे मोठमोठाले खडपे एकमेकांना दूर ढकलूं लागले; आणि डिसकव्हरी जहाज १६ फेब्रुआरीला मोकळें झालें. स्कॉटनें अर्थात्च या जहाजाचें पुढारीपण पुन्हां घेतलें. पुन्हां नाना प्रकारच्या संकटांना तोंड देत देत ते १९०४, मार्चच्या १५ तारखेला न्यूझिलंडजवळील **ऑक्लंड** बेटांना येऊन लागले. अशा रीतीनें स्कॉट्ची दक्षिण ध्रुवाकडील ही पहिली स्वारी समाप्त झाली.

या संशोधन भ्रमंतींत हातीं काय काय लागलें याचा हिशेबही पाहण्यासारखा आहे. **अन्तार्कृतिक्** या नांवानें आतां मोडूं लागलेलें जें खंड

होतें, त्याच्या किनाऱ्याचें संशोधन आतापर्यंत कांहीं साहसी नावाड्यांनीं केलेंच होतें. त्या किनाऱ्याच्या बाजूबाजूनें स्कॉट् हा पुष्कळच पुढें गेला होता. किती तरी मैल लांबीचा या खंडाचा नवा किनारा त्यानें या भ्रमंतींत शोधून काढला. जेथें जेथें शक्य झालें, तेथें तेथें घसरगाड्यांतून त्यानें प्रवास केला आणि आंतील टापूत कोठें काय आहे याची नोंद केली. भूस्तरविद्येच्या आणि भूगर्भाच्या अभ्यासाला फार उपयोगी पडणारा असा विविध प्रकारचा पुरावा त्यानें गोळा केला. तिकडल्या टापूंत कोणते पशुपक्षी आहेत याचेंही सूक्ष्म अवलोकन त्यानें केलें. त्याचा तेथें वातावरणाचा पुष्कळच अभ्यास झाला. पृथ्वीच्या आकर्षणाचे कांहीं विशेष न्यायही त्याच्या ध्यानांत आले. अर्थात् हीं सर्व कामें करतांना त्याला आणि त्याच्या बरोबरीच्या लोकांना मनस्वी संकटें सोसावीं लागलीं. मात्र तीन सव्वातीन वर्षांच्या अवधींत आणि असल्या धोक्याच्या कामांत ‘ डिसकव्हरी ’ जहाजावरील एकच माणूस दगावला. आतापर्यंत झालेल्या कोणत्याही समुद्रभ्रमन्तींत इतकी कमी मनुष्यहानी झालेली नव्हती.

जहाजावर सगळीं मिळून पन्नास माणसें होतीं. तीं सर्व अत्यन्त एकदिलानें वागलीं. संकटाच्या काळीं तीं परस्पराच्या सहाय्याला धावलीं. एकाही माणसानें कधीं शिस्त मोडली नाहीं; आणि सर्वांनीं मिळून इंग्लंडच्या कीर्तींत भरच घातली. न्यूझिलंडमधूनच स्कॉटनें आपल्या कामाचें इतिवृत्त आरमार खात्याकडे लिहून धाडलें होतें. पण घरीं येऊन पोहोंचल्यावर सरकारनें त्याला नऊ महिन्यांची रजा दिली आणि भ्रमन्तीचा इतिहास त्याच्याकडून लिहवून घेतला.

---

# ५ शॅकलटनची सफर

शॅकलटन् नांवाचा एक शूर नाविक स्कॉट इत्यादिक दक्षिण ध्रुवप्रदेशांत अडकून पडलेल्या लोकांना सोडवण्यासाठीं पाठवलेल्या मॉर्निंग जहाजाबरोबर गेलेला होता. स्कॉटचें संशोधनकार्य त्याच्या मनांत फार भरलें होतें. तो स्वतःही मोठा ईर्षावान मनुष्य होता. तिकडून परत आल्यानंतर रॉयल्स स्कॉटिश जोग्रॅफिकल या सोसायटीच्या कार्यवाहाची जागा त्याला मिळाली; आणि मग दक्षिणध्रुवाकडे पुन्हां जावें असें त्याला वाटूं लागले. स्कॉट परत येऊन बरेच दिवस झाले होते; आणि इंग्लंडचें लोक दक्षिण ध्रुवाची वार्ताही विसरले होते. पण १९०७ सालीं शॅकलटन् यानें पुन्हां हा विषय राष्ट्रापुढें मांडला आणि कोणी मित्रांनीं २ लाख रुपये एकदम देऊं केले. शॅकलटन् यानें निम्रॉड नांवाचें जहाज तयार केलें आणि सर्व प्रकारची अद्ययावत् सिद्धता त्यावर करून घेतली. सामानसुमानानें जहाज तोंडोतोंड भरून गेलें होतें. त्यांत एक मोटार गाडीही होती! नऊ कुत्रीं, कांहीं बकरीं आणि थोडीशीं तट्टें त्यानें बरोबर घेतलीं. वाइल्ड आणि जॉईस या नांवाचे स्कॉटच्या डिसकव्हरी जहाजावरील अनुभवी लोक त्यानें बरोबर घेतले; आणि राणी अलेक्झँन्ड्रा हिनें दिलेलें निशाण बरोबर घेऊन १९०७ च्या जुलै ३१ ला तो थेम्समधून बाहेर पडला.

१५०० मैलपर्यंत कुन्या नांवाच्या एका जहाजानें निम्रॉड जहाज केवळ ओढीतच नेलें. निम्रॉड जहाजावरील सर्पणाची बचत व्हावी म्हणून हा उपाय योजलेला होता! दक्षिणध्रुव प्रदेशाच्या आसपास आल्यावर कुन्या जहाज परत निघून गेलें. शॅकलटन्नें असा बेत केला कीं, आपल्या

लोकांच्या तीन तुकड्या कराव्या. एकीनें किंग एडवर्ड भूमीकडे जावें; दुसरीनें मॅगनेटिक् पोलकडे जावें;आणि तिसरीनें प्रत्यक्ष दक्षिण ध्रुवाकडे जावें.

निम्रॉड जहाज येतां येतां **रॉस बेटाच्या** पश्चिमेकडे आलें आणि **फ्लॅग स्टाफ् पॉइंट** येथें खलाशी लोक खालीं उतरले. येथें त्यांनीं एक झोंपडी उभी केली; आणि बोटीवरचें सगळें सामान त्यांनीं खालीं घेतलें. हें सामान खालीं काढण्याचें काम इतकें कष्टाचें होतें कीं, कांहीं लोकांना जेवतां जेवतांच झोंप लागली; आणि एंजीन चालवणारा माणूस भुईवरच पसरून राहिला. इतक्यांत सोसाट्याचें वादळ सुटलें. झोंपडी उडून जाऊं नये म्हणून तिच्या डोक्यावरून आडव्या तिडव्या तारा गच्च बसवून त्यांनीं त्या खालीं ठोकून टाकल्या.

५ मार्चेला डेव्हिड, मॉसल आणि मॅके असे तिघे इरेबस शिखर चढून जावयासाठीं झोपडींतून बाहेर पडले. हे शिखर जवळ जवळ साडेतेरा हजार फूट उंच होतें. इरेबस शिखर चढून जाणें हें कांहीं दक्षिण ध्रुवाच्या शोधापैकीं एक काम नव्हतें. दक्षिण ध्रुवप्रदेशाच्या संशोधनांत मात्र या कामाची गणना खचितच होत होती. या शिखरावर गेलेल्या लोकांना फार संकटें सोसावीं लागली आणि कित्येकदां तर त्यांच्या जिवावरच येऊन बेतलें. तथापि हे लोक मोठ्या हिमतीनें शिखर चढून वर गेले.

हिंवाळ्याचे दिवस अगदींच वायां जाऊं नयेत म्हणून शॅकलटन् यानें सरकगाड्यांचे कांहीं प्रवास करून पाहिले. पण आतां शॅकलटन्चें मुख्य काम म्हणजे दक्षिणध्रुवाच्या दिशेनें कुच करणें हें होतें. नोव्हेंबर ३ ला शॅकलटन् व त्याचे तिघे मित्र आपल्या झोंपडींतून बाहेर पडले. रोज सुमारें १६ मैल वाटचाल सुरू झाली. वाटेनें सामानसुमानांची मकाणें बनाविणें व परतीची वाट नीट सांपडावी म्हणून ऐरणी घालणें हीं कामें चाललींच होतीं. हळूंहळूं अन्नाची टंचाई होऊं लागली; म्हणून बरोबरच्या तट्टांपैकीं

जें अधिक दमलेसें दिसें तें मारून टाकून त्याचें मांस कापून काढण्याच्या उद्योग यांना मधून मधून करावा लागे. तट्टें मेल्यामुळें मांस जरी मोकळें झालें तरी, सामानसुमान वाहून नेण्याची मात्र गैरसोय होऊं लागली. दरम्यान थोडें पूर्वेकडे वळून जातात तों एक पर्वताची प्रचंड भिंत त्यांना दिसूं लागली. ३००० फूट उंचीचा हा पर्वत चढून गेल्यावर त्यांना एक ग्लेशिअर लागलें. त्यावरून जातांना मोठमोठाले पाषाण कोसळतांना भेटत; आणि बर्फाच्या भूमींत मोठमोठाल्या घळी पडलेल्या दिसत. बारा दिवसपर्यंत असल्या ग्लेशरवर त्यांचा प्रवास चाललेला होता. शॅकलटन्‌ला स्वतःला पुरे दोन दिवसांपर्यंत हिमान्ध्य प्राप्त झालें होतें! ७ डिसेंबरला वाईल्ड या नांवाचा त्यांचा मित्र एका मोठ्या थोरल्या खड्डयांत जवळ जवळ गडपच झाला. पण शॅकलटन् वगैरे पुढें गेलेले लोक त्याच्या हांका ऐकून परत धावत गेले; आणि त्यांनीं त्याला कसें तरी वर खेंचून काढलें.

आतां अन्न संपत आलें, रोज प्रत्येक माणसाला फराळाला दोन बिस्किटें मिळावयाचीं असें ठरलें. पण इतके हाल सोसूनही ध्रुवाला जाऊन भिडावयाचें ही त्यांची ईर्षा कायमच राहिली. ग्लेशिअर आज संपेल, उद्यां संपेल, असें वाटावें तों त्याची उंची वाढतच चालली. डिसेंबर २५ ला ८५ रेखांशाच्या पुष्कळच पुढें जाऊन ते पोहोंचले. साडेनऊ हजार फूट उंचीवर गेल्यावर राणीच्या निशाणाखालीं उभें राहून त्यांनीं आपलें छायाचित्र काढलें आणि सण म्हणून मुद्दाम जपून ठेवलेले कांहीं मिष्ट पदार्थ त्या दिवशींच्या जेवणाबरोबर त्यांनीं खावयास काढले.

अजून ध्रुवबिंदूला पोहोंचून पुन्हां अन्नाच्या मकाणावर परत यावयाचें म्हणजे ५०० मैलांचा प्रवास होता; आणि हातांशीं अन्न फक्त १ महिन्याचें उरलेलें होतें! म्हणून त्यांनीं ठरविलें कीं, आठ दिवसांचें अन्न दहा दिवसांना पुरवावयाचें. कांहीं सामानसुमान त्यांनीं मध्येंच ठेवून दिलें.

तरीसुद्धां ७५ शेर वजनाचा बोजा प्रत्येकाला ओढावा लागत असे. डिसेंबर २७ ला ९८२० फूट उंचीवर ते गेले आणि ३१ डिसेंबरला १०,४७७ फुटावर गेले. इतक्या उंचीवर गेल्यावर त्यांना श्वासही नीट घेतां येईना. थंडीनें त्यांचे उच्छ्वास गोठूं लागले आणि त्या गोठलेल्या उच्छ्वासांत त्यांच्या वाढलेल्या दाढ्या आणि कपडे हे एकमेकांत चिणून जाऊं लागले. जवळची कात्री वाटेंत टाकलेल्या सामानसुमानांत राहिलेली होती. त्यामुळें दाढ्या कपड्यांपासून सोडवून घेतांना तडतडीच्या झालेल्या त्या वेदना त्यांच्या त्यांनाच माहीत.

१९०९ जानेवारी २ ला ग्लेशिअर मागें राहिलें आणि ध्रुवप्रदेशाचें तें गोठलेलें पठार पुढें दिसूं लागलें. वास्तविक आतां ध्रुव जवळ आलेला होता; पण शॅकलटनला हें कळून चुकलें होतें कीं, आपण ध्रुवावर पोहोंचलों तरी तें वर्तमान परत जाऊन सांगावयास भुकेमुळें कोणी उरणार नाहीं. तथापि हे चौघेजण तसेच निकरानें पुढें निघाले. ध्रुव बिंदुपासून शंभर मैलांवर तरी आपण जाऊन पोहोंचूं, एवढें श्रेय तरी आपल्याला लाभावें अशी त्यांची ईर्षा होती. ६ जानेवारीला त्यांनीं गाड्या ओढण्याचें काम सोडून दिलें. त्यांना वाटत होतें कीं, ७ तारखेला कसलेंही सामान बरोबर न घेतां ध्रुवबिंदूच्या परिसराकडे एकच धूम ठोकावी; तेथें निशाण रोवावें; आणि त्याच पावलीं परत तडक निघावें! पण त्या दिवसापासूनच बर्फाचें घनघोर वादळ सुरू झालें. ९ तारखेला सकाळीं वादळ मंदावलेलें पाहून ते जीव तोडून पांच तासपर्यंत पुढें गेले. आतां ध्रुवबिंदु ९७ मैल राहिलेला होता!

या ठिकाणीं शॅकलटन्नें इंग्लंडचें निशाण उभें केलें आणि हा सारा प्रदेश इंग्लंडच्या मालकीचा आहे असें जाहीर केलें! आतां पुढें जाणें म्हणजे मरण पत्करणेंच होतें. म्हणून त्यांनीं अलेक्झॅन्ड्रा राणीचें तें निशाण

खालीं घेतलें; आणि मोठ्या वेगानें ते परत फिरले. परतीच्या वाटेवर जुन्या खुणा त्यांना ठिकठिकाणीं भेटल्या; आणि आपण मरणाच्या दाढेंतून सुटून परत चाललों आहों या जाणीवेचें सुख त्यांना होऊं लागलें. ते रोज २० मैल चालूं लागले. शॅकलटन्च्या दोन्हीं टांचा भेगाळल्या आणि हीं चारही माणसें अगदीं रकमेला आलीं. गोठलेल्या ध्रुवप्रदेशपठारांतून ते पुन्हां गेशरवर आले आणि आतां मात्र आपण भुकेनें मरणार असें त्यांना दिसूं लागलें. जानेवारीच्या २५ तारखेला सकाळीं पावणेसात वाजल्यापासून ते रात्रीं ९ वाजेपर्यंत एक पेला चहा, दोन बिस्किटें आणि दोन चमचे दही, येवढ्यावर त्यांचें गाड्या ओढणें चाललेलें होतें! असो. येतां येतां २७ तारखेला ते बॅरिअरवर येऊन पोहोंचले.

इथल्या मकाणावर सहा दिवसांचें अन्न राखून ठेवलेलें होतें; आणि तें सुद्धां मेलेल्या घोड्याचें मांस होतें. आतां ते अगदीं दमले. ४ फेब्रुवारीला तर त्यांना मुक्कामच करावा लागला. पुढें १५ तारखेपर्यंत वाटचाल करीत असतांना त्या सर्वांच्याच तोंडून अन्नाशिवाय दुसरी बात निघत नव्हती! १९ तारखेला त्यांना इरेबस शिखर दिसूं लागलें आणि अन्नाचें नवें मकाण सापडलें. पुढची हकीकत देण्याची आवश्यकता नाहीं. शॅकलटन् यानें आपल्याकडून शिकस्त करून पाहिली आणि ९७ मैलावर ध्रुवबिंदु राहिला असतां, त्याच्या या तुकडीला, केवळ मरण ओढवेल म्हणून, यशाच्या दारांतून परत फिरावें लागलें. तथापि शॅकलटन्ची मोहिम आतांपर्यंतच्या सर्व मोहिमांत अधिक यशस्वी झाली, हें कांहीं खोटें नाहीं. अर्थातच ध्रुवबिंदुकडे जाणाऱ्या लोकांत शॅकलटन्चा महिमा फारच मोठा समजतात.

---

# ६ अमुंडसेनचें पर्यटण

बेल्जिका नौकेचें वर्णन करतांना अमुंडसेन या नांवाचा उल्लेख करावा लागला होता. हा नॉर्वेजियन संशोधक १८७२ मधें जन्मला. याचें शिक्षण ओस्लो येथें झालें. वैद्यक शास्त्राचा अभ्यास त्यानें सुरू केला. परंतु तो पुढें सोडून देऊन तो नाविक बनला. १९०१ सालीं तो उत्तरध्रुव प्रदेशांत गेला. तेथें त्यानें बरींच पर्यटणें केलीं. त्यांतली एक प्रमुख सफर म्हणजे वायव्येकडील मार्ग शोधून काढण्याची होय. १९१० मधें तो फ्रॅम या जहाजांतून दक्षिण महासागरांत शिरला आणि डिसेंबर १७, १९११ या दिवशीं दक्षिण ध्रुवास जाऊन तो पोहोंचला. पुढें विमानांतून उत्तरध्रुवावर जावें अशी मनीषा बाळगून त्यानें वैमानिक खात्यांत नोकरी धरली; परंतु त्याची ती मनीषा पूर्ण झाली नाहीं. होतां होतां १९२६ मध्यें उत्तरध्रुव ओलांडून तो अलास्का येथें उतरला. १९२८ त आपल्या मोबाईल नांवाच्या इटालियन मित्राला सोडवण्यासाठीं पुन्हां एकदां तो उत्तर ध्रुवाकडे गेला असतांना मरण पावला. उत्तर ध्रुवप्रदेशांतील त्याचे पराक्रम कितीही मोठे असले तरी संशोधनाच्या इतिहासांत दक्षिण-ध्रुवाचा संशोधक ही त्याची कीर्तींच अजरामर राहील. दक्षिणध्रुव गांठण्यासाठीं त्याची आणि स्कॉटची जणूं कांहीं शर्यतच लागली होती. ही शर्यत अमुंडसेननें मोठ्या ईर्षेनें जिंकली. या शर्यतींत इंग्लिश इतिहास-कार, अमुंडसेनचें महत्व कमी करण्याचा यत्न करतात; परंतु निःपक्षपाती बुद्धीनें पाहिलें तर स्कॉटचें श्रेय स्कॉटला देऊनही अमुंडसेन हाच या संशोधनाच्या कामांतील अग्रेसर पुरुष ठरतो.

बेल्जिका नौका दक्षिण ध्रुवाकडून परत आल्यानंतर अमुंडसेन यानें जोआ नांवाची एक छोटीशी नौका तयार केली. आणि कॅनडा वसाह-

तीच्या उत्तरेला असलेल्या सामुद्रधुन्यांत तो बेलाशक शिरला. या सामुद्र-धुन्या बर्फानें चोंदून गेलेल्या असत. त्यामुळें इकडच्या बाजूनें म्हणजे वायव्येच्या बाजूनें, पॅसिफिक महासागरांत किंवा आर्क्टिक् महासागरांत उतरण्याचें काम कोणाला आजवर साधलें नव्हतें. अमुंडसेन यानें या कामांत पाहिल्यानेंच यश मिळाविलें. पुढें त्यानें ठरवलें कीं, नानसेन् या संशोधकानें ज्या फ्राम नांवाच्या जहाजांत बसून दक्षिणध्रुवप्रदेशांत शिरकाव केला होता, त्यांतूनच आपण पुन्हां एकदां उत्तर ध्रुवाच्या शोधाला जावें. पण इतक्यांत वर्तमान येऊन थडकलें कीं, पेरी हा उत्तर ध्रुवावर जाऊन पोहोंचला आहे. अर्थातच पुन्हां तिकडे जाण्यांत कांहींच वैशिष्ट्य नव्हतें; म्हणून अमुंडसेननें आपला मोहरा दक्षिण ध्रुवाकडे वळविला.

दक्षिणध्रुवाकडील स्वारीची योजना अमुंडसेन यानें फार कौशल्यानें केली. हिमप्रदेशांतून त्यानें पुष्कळच पर्यटणें केलेलीं असल्यामुळें त्या अनुभवाचाही उपयोग त्याला करून घेतां आला. इंग्रज लेखकांचें म्हणणें असें आहे कीं, या शर्यतींत स्कॉट् याच्या पुढें तो साठ मैल आधींच जाऊन बसला होता. पण एक ध्यानांत हवें कीं, या चढाओढीला शर्यत असें जरी म्हटलें तरी स्कॉट आणि अमुंडसेन यांचा मार्ग मात्र एकच नव्हता. दक्षिण ध्रुवप्रदेशावर कोणीकडून चाल करावी हें ज्यानें त्यानें आपल्या अकलेनें ठरविलें आणि या कामीं असें दिसून आलें कीं, मार्ग निश्चित करण्याच्या कामीं अमुंडसेन यानें जास्त चातुर्य दाखविलें.

फ्राम नांवाची ती नौका १९१०, ऑगस्ट ९ या दिवशीं नॉर्वेचा किनारा सोडून निघाली. नौकेंत १८ माणसें आणि ९७ एस्किमो जातीचे कुत्रे होते. अन्तार्कतिक् समुद्रांत शिरेतोपर्यंत अमुंडसेन कोठेंही थांबला नाहीं. तो सरळ गेला तो व्हेलस उपसागरांत जाऊन उभा राहिला.

कोणी कोणी म्हणत कीं, दक्षिण महासागरांतील वादळांत ही जुनीपुराणी फ्राम नौका तग धरावयाची नाहीं. पण १९११, जानेवारी १४ रोजीं ती या उपसागरांत तर येऊन थडकली. कांठावरील बर्फ-प्रदेशांत एक मोठी घळ पडल्यासारखी दिसत होती आणि ही मागें 'बर्फाची दरड' या नांवानें वर्णिलेल्या प्रदेशांच्या कडेपासून दोन मैल आंत होती. या घळींत अमुंडसेननें एक लहानशी झोंपडी बांधली. आणि तिचें नांव 'फ्राम हिम' असें ठेविलें. जहाजावरून नऊ माणसांनीं चट् सारें सामानसुमान खालीं काढून दिलें; आणि उरलेल्या नवांनीं तें झोपडींत नेऊन रचून ठेविलें. जानेवारी २८ पर्यंतचे दिवस या कामांत गेले. अमुंडसेन यानें तीन माणसें बरोबर घेतलीं आणि हिंवाळा पडण्याच्या आधींच ८०, ८१ व ८२ या तीन रेखांशांवर आपलीं मकाणें त्यानें रचून ठेवलीं. या पहिल्या धडाक्यांतच तो स्कॉटच्या किती तरी पुढें गेला. आतांपर्यंत झालेल्या स्वाऱ्या भुकेमुळें फसल्या होत्या. आतां तसें होऊं नये, म्हणून अमुंडसेन यानें प्रत्येक मकाणांत एक एक टन, इतकें अन्न आधींच सांठवून ठेविलें. मकाणांचा पत्ता नीट लागावा म्हणून, खुद्द मकाणांवर आणि त्यांच्या दोन्ही बाजूला पांच पांच मैलपर्यंत त्यानें निशाणें रोवून ठेवलीं; आणि या निशाणांवर अनुक्रमांचे त्यानें आंकडे घातले. त्यामुळें धुकें कितीही पडलेलें असलें तरी, एकादें निशाण जरी हातीं लागलें तरी आपण कोठें आहों हें त्यांना कळण्याची सोय झाली.

खुद्द फ्राम हिम झोंपडींत ५० टन सील माशांचें ताजें मांस त्यानें सांठवून ठेवलें; आणि ९७ कुत्र्यांना १० स्वतंत्र तंबू उभारून ठेविले. हिंवाळ्यांत तेथेंच वस्ती करावी लागली तर ही तरतूद अवश्यच आहे, असें त्याचें मत होतें. संशोधनाचें कामही त्याच्या लोकांनीं तेथेंच चालू केलें. इतक्यांत हिंवाळा सुरू झाला आणि जिकडून तिकडून बर्फाचा

वर्षाव होऊं लागला. पण फ्राम हिम झोंपडी बर्फानें चांगली चिणून घेतली असल्यामुळें अठराही मंडळींची प्रकृति चांगली खणखणीत राहिली.

थंडीचा कडाका वसंत ऋतु सुरू झाला तरी कायमच होता. म्हणून



अमुंडसेन याला कांहीं दिवस थांबावें लागलें. हवा थोडी निवळतांच त्यानें आपल्या तुकडीचे दोन विभाग केले. पांचांनीं ध्रुवाकडे जावयाचें, तिघांनीं किंग एडवर्ड लॅंडकडे जावयाचें आणि स्वयंपाक्यानें फ्राम हिम झोंपडींत बसून रहावयाचें. ध्रुवाकडे जाणारी मंडळी म्हणजे अमुंडसेन, हनसेन्, विस्टींग, हॅसेल आणि जालंद हीं होतीं. यांच्याबरोबर चार सरक-गाड्या आणि ५२ कुत्रे होते. या कुत्र्यांनीं आपल्या गाड्या जोरानें ओढाव्या म्हणून ज्याच्या अंगावर 'छू' म्हटल्यानें हे कुत्रे जोरानें धांवतील असा एकजण कोणी तरी त्यांच्या पुढें राही. प्रवासाला एकदम सुरवात झाली आणि ८५ रेखांशावर ते तडक जाऊन पोहोंचले.

दिवसाला सुमारें १७ मैल अशी त्यांची प्रगती झाली. अमुंडसेन बहुतेक प्रवासांत सरकगाडीवरच बसून राहिला होता. दर पांच सहा मैलांवर ते एक बर्फाची ऐरण घालीत घालीत पुढें चालले होते. हेतू हा कीं, परत येतांना वाट निश्चितपणें सांपडावी.

इतक्या वेगानें ते गेले याचा अर्थ त्यांचा प्रवास सुखाचा झाला असें मात्र नाहीं. जातां जातां अमुंडसेनची गाडी एका खोल खड्ड्याच्या अगदीं कंगोऱ्यावर येऊन ठेपली. गाडी थोडी बाजूला गेली असती तर सर्वांचाच निकाल लागला असता. एकदां एक गाडी बर्फाच्या एका चिरणींत सांपडली आणि त्यांतून ती त्यांनीं कशीबशी बाहेर काढली. पण ही काढतांना त्यांच्या पायाखालचा बर्फाचा दगड जर निसटला असता तर साराच ग्रंथ तिथें आटोपला असता !

नोव्हेंबरच्या १० तारखेला एक प्रचंड डोंगरांची रांग त्यांना समोर दिसूं लागली. ही रांग १५००० फूट उंच होती. हिला त्यांनीं **'नानसेन् पर्वत'** असें नांव दिलें. पलीकडे एक शिखर होतें. त्याचें **पेड्रो ख्रिस्तोकरसन्** शिखर हें नांव त्यांनीं ठेवलें. बर्फाच्या दरडीवर दूरपर्यंत लहान मोठे उंचवटे लागलेले होते. आतां कुत्रे मारून खाण्याची पाळी त्यांच्यावर आली. इतके थोरले कुत्रे बरोबर नेण्यांत अमुंडसेनचा हेतू हाच होता कीं, सामान ओढावयासही त्यांचा उपयोग व्हावा; आणि वेळ पडल्यास ते मारूनही खातां यावे. १७ नोव्हेंबरला **ॲक्सेलहीबर्ग** ग्लेशिअर ( चलत् हिमप्रदेश ) चढावयास त्यांनीं आरंभ केला.

हिम प्रदेशावरील त्यांचा प्रवास फारच कष्टाचा आणि धोक्याचा ठरला. लांबलचक दोर त्यांनीं एकमेकांच्या कंबरेला आणि गाड्यांना बांधलेले होते, अशासाठीं कीं कोणीही निसटलें तरी बाकीच्यांच्या ओढीनें त्याला स्थिर होतां यावें. हे सारेजण अगदीं थकून गेले; आणि धांपा टाकीतच

सुमारें ११,००० फूट उंच असलेल्या पठारावर येऊन ते पोहोंचले. पण तेथें पाहतात तों, दाट धुकें पसरलेलें असून कोणी कोणाला दिसेनासे झाले. मोठमोठालीं पर्वतांचीं राक्षसी माथीं बाजूला दिसत होतीं. पुढें जाणें अशक्य दिसल्यामुळें त्यांनीं तेथेंच तळ ठोकला आणि ठरल्याप्रमाणें तीं विश्वासू जनावरें त्यांनीं मारून खाल्लीं. या तळाला ‘ खाटकाचें दुकान ’ असें नांव त्यांनीं दिलें.

पांच दिवस ते येथें बसून होते. धुकें आणि बर्फाचा वारा यांमुळें त्यांना अगदीं नकोसें झालें. तेव्हां अमुंडसेननें बाकीच्यांना विचारलें, “ काय वाटेल तें झालें तरी पुढें जावयाचें ना ? ” त्यांनीं होकार दिला आणि त्या मेलेल्या कुत्र्यांची एक रास घालून, आणि मध्यें एक बावटा उभा करून ते पुढें चालूं लागले. पुढची वाट एका उतारानें होती. त्यामुळें कुत्रे खूप झपाट्यानें पळूं लागले. पुन्हां एकदोन दिवस मुक्काम करून ते पुढें जातात तों एक अतिशय मोठा चढ लागला; पण पुढें काय आहे याचा कसलाही अंदाज लागेना. तरी ध्रुवाच्या रोखानें त्यांची पायपिटी चालूंच राहिली. २८ नोव्हेंबर दिनीं धुकें पुष्कळच उलगडलें. पुढें पहातात तों, एक प्रचंड पर्वत समोर दिसूं लागला आणि त्याचे दोन्ही हात दूरवर गेलेले दिसले. पर्वताच्या पलीकडे काय आहे याची कोणालाच कल्पना नव्हती. पण हे साहसी लोक तसेच पुढें जाऊं लागले. पुन्हां धुकें पसरलें आणि बर्फाच्या भूमीला तडे गेलेले दिसूं लागले. अमुंडसेन आणि हनसेन् यांनीं एकमेकांच्या कंबरेला दोर बांधले आणि थांबावें, वळावें, सरळ जावें, असें करीत करीत ते पुढें चालले. शेवटीं आतां पुढें जातां येत नाहीं आणि मागेंही फिरतां येत नाहीं असें दिसूं लागलें ! म्हणून त्यांनीं तेथेंच तळ ठोकला आणि अमुंडसेन एकटाच वाट सापडते कां हें पहावयास आजूबाजूला जाऊन आला.

दुसऱ्या दिवशीं ते पुन्हां पुढें निघाले, तों वाटेंत एक मोठी थोरली घळ दिसली. तिच्यावर एक बर्फाचा पूल बनलेला होता. पुलावरून जाणें म्हणजे मरण पत्करणेंच होतें. डिसेंबर १ आणि २ या दिवशीं त्यांना केवळ पांचच मैल पुढें सरकता आलें. पण आतां ते ८६ रेखांशाच्या पुढें पुष्कळच गेलेले होते. आतां ध्रुवाची ओढ त्यांना चांगलीच लागली. इतके केलेले श्रम वाया जाऊं नयेत अशा इर्षेनें ते पुढें निघाले. तीन तारखेला हवा थोडी बरी पडली आणि बर्फाचें तें आरशासारखें पृष्ठ पाहून प्रत्यक्ष ध्रुवप्रदेशाचें पठार आतां आटोक्यांत आलें आहे, असें त्यांना स्पष्ट दिसून आलें. इतक्यांत विस्टींगची गाडी एका भगळींत उलटली; आणि हनसेन् याचे कुत्रे असेच कोठें तरी एकदम घसरले. सुदैवानें कांहीं फूट खालीं कठीण बर्फ आहे असें त्यांना दिसून आलें.उलथून पडावें, पुन्हां बसावें, असें किती तरी वेळां झालें. म्हणून या टापूला त्यांनीं 'सैतानाचें नृत्यमंदिर' ( डेव्हिल्स् बॉलरूम ) असें नांव दिलें. या नृत्यमंदिरांतील त्यांचा तो भयानक नाच संपला आणि ते थोडें पुढें जातात तों आपण ध्रुवप्रदेशाच्या पठारावर प्रत्यक्ष येऊन पोहोंचलों आहों असें त्यांना दिसून आलें. मग एक जोराची धूम ठोकून ते ध्रुवाच्या मुक्कामा-वर जाऊन पोहोंचले. जालंद यानें आपल्या खिशांतील सिगारेटची पेटी बाहेर काढली. याच प्रसंगासाठीं त्यानें ती मुद्दाम ठेवून दिली होती ! तिचे झुरके मारीत, आपण एक प्रचंड कृत्य केलेलें आहे असा आनंद उप-भोगीत १६ डिसेंबर हा संबंध दिवस त्यांनीं घालवला. आपल्या बरोबर शर्यतींत गुंतलेले आपले इंग्रज बांधव येथें आधींच येऊन पोहोंचलेले आहेत कीं काय, हेही त्यांनीं बारकाईनें पाहिलें. पण ते आल्याची कसलीही खूण त्यांना आढळली नाहीं. अर्थात् ध्रुवबिंदूवर जाऊन पोहोंचल्याचा मान इतिहासांत आतां आपल्याकडे शाश्वतचा राहणार

अशी त्यांची खात्री होऊन चुकली. या ठिकाणाला त्यांनीं **पोल होम** म्हणजे ध्रुवाचें घर असें नांव दिलें. समुद्राच्या सपाटीपासून हें ठिकाण १०२५० फूट उंच होतें. त्यांनीं तेथें तंबू ठोकला आणि त्याच्यावर नॉर्वेचें निशाण फडकत लावलें. दुसऱ्या एका निशाणावर 'फ्रांस' असा शब्द लिहून तेंही त्यांनीं तेथें उभें केलें. कॅप्टन स्कॉट याच्या नांवानें अमुंडसेन यानें एक पत्र लिहून ठेविलें; आणि त्यांना कांहीं उपयोगी पडण्यासारख्या वस्तूही तेथें ठेवून दिल्या. कदाचित् आपल्या सवंगड्यासह स्कॉट तेथें आला तर त्याला हें वर्तमान कळावें आणि त्या वस्तूंचाही उपयोग व्हावा अशी त्यांची इच्छा होती. येवढी विजयाची ध्वजा उभी करून हा नॉर्वेजियन संशोधक पुन्हां उत्तरेकडे परत फिरला.

---

# ७ स्कॉट्ची दुसरी सफर

आतां स्कॉट्ची बढती भराभर होऊं लागली. ही बढती एकीकडे चालू असतां १९०७ मध्यें लंडन येथें कॅथलिन् ब्रूस या नांवाच्या एक कुमारिकेची आणि त्याची गांठ पडली. ही कुमारी खोद–कामाचा अभ्यास करीत असे. १९०८ सालच्या सप्टेंबर महिन्यांत या दोघांचें लग्न लागलें. स्कॉट्चें लग्न झालें हें ऐकतांच 'डिसकव्हरी' जहाजावर त्याच्या बरोबर जे लोक गेले होते, ते म्हणूं लागले कीं, आतां स्कॉट-साहेबांचें संशोधनकार्य संपुष्टांत आलें म्हणून समजावें! पण त्यांना असें वाटलें तरी, आंतून एक निराळीच तयारी चालू होती. प्रत्यक्ष दक्षिण-ध्रुव शोधून काढला पाहिजे अशी स्कॉटची आकांक्षा होती आणि

इंग्लंडातील लोकांनाही तो मान मिळवावयाचा होता. म्हणून त्यांनीं जुळवा-जुळव सुरू केली. इंग्लंड, आस्ट्रेलिया, न्यूझीलंड आणि साऊथ आफ्रिका येथील सरकारांनीं पैशाची मदत केली. पण या नव्या स्वारीचें खरें श्रेय स्कॉट्लंडकडेच जातें.

भ्रमन्तीची तारीख ज्या दिवशीं जाहीर झाली, त्याच्या दुसऱ्या दिवशीं स्कॉट्ला मुलगा झाल्याचें सर्वांना कळलें ! या भ्रमन्तीचे दोन हेतू होते. एक म्हणजे दक्षिणध्रुवाला जाऊन पोहोंचणें आणि दुसरा म्हणजे रॉस समुद्राच्या टापूंतील सर्व प्रदेशांचें शास्त्रीय संशोधन करणें. या दुसऱ्या कामासाठीं डॉ. विलसन्, डॉ. सिमसन्, अरकिन्सन् यांच्यासारखे मोठ-मोठाले तज्ञ लोक स्कॉट्ला येऊन मिळालेले होते. टेर नोव्हा म्हणजे नवी भूमि या नावाची स्कॉट्ची ही संशोधन-नौका १९१० जूनच्या पहिल्या तारखेला थेम्स नदींतून बाहेर पडली. स्कॉट् स्वतः केप ऑफ् गुड् होप्-पर्यंत एका स्वतंत्र बोटींतून गेला. सप्टेंबर २ रोजीं ही भ्रमन्ति सुरू झाली आणि १२ आक्टोबरला स्कॉट् हा मेलबोर्न येथें जाऊन पोहोंचला. येथेंच त्याच्या भावी अपयशाची पहिली चुणूक त्याला लागली. अमुंड-सेननें धाडलेली एक तार त्याला येथें मिळाली. या तारेंत अमुंडसेननें म्हटलें होतें कीं, ‘मीही दक्षिणध्रुवाचा शोध करण्यासाठीं निघालों आहें.’ स्कॉट्ला वाटूं लागलें कीं, हा नॉर्वेजियन संशोधक या शर्यतींत कदाचित् आपल्याला मागें टाकील आणि आपलें हें काम अगदीं फसेल. पण आतां या भीतीचा कांहीं उपयोग नव्हता. हातीं घेतलेलें काम तडीस नेणें त्याला प्राप्तच होतें. १९१० नोव्हेंबर २८ ला स्कॉट् हा दक्षिण महासागरांत शिरला. तोंपर्यंत त्याची बायको त्याच्याबरोबर होती. यानंतर या पतिपत्नींची भेट पुन्हां जन्मांत कधीं झालीच नाहीं.

अन्टार्क्टिक् रात्र सुरू होण्याच्या आधींच, स्कॉट् हा न्यूझीलंडचा किनारा सोडून निघालेला होता. पण निघण्याच्या वेळींच स्कॉट्ला बातमी लागली कीं, अमुंडसेन हा व्हेल्स उपसागरापर्यंत पोहोंचलेला आहे; म्हणजे आपल्यापुढें तो साठ मैल आहे. दक्षिण ध्रुवप्रदेशांतील प्रवासाचे तीन टप्पे त्यानें केले होते. बर्फाची दरड म्हणजे आइस् बॅरिअर, या नांवानें मोडणाऱ्या प्रदेशांतून पुढें जाणें; त्यानंतर हिमनद्यांचा प्रदेश लागतो तो ओलांडून पुढें जाणें; आणि शेवटीं महाभयंकर असे कोरड्या बर्फानें आच्छादलेलें उंचच उंच पठार लागतें तें तुडवीत दक्षिण ध्रुवापाशीं जाऊन पोहोंचणें. असल्या प्रवासासाठीं कांहीं आगाऊ तरतुदी कराव्या लागतात. पुढें जाऊन ठिकठिकाणीं मकाणें स्थापावीं लागतात. अर्थात् या कामांतील शेवटचा हप्ता मात्र या प्रास्ताविक कामांत येत नाहीं. पुढें माणसें धाडधाडून अशीं मकाणें स्कॉट्नें तयार करून ठेवलीं. तंबू, खाद्य-पेयें, इत्यादि प्रकारचें सामान अंगावरूनच वाहावें लागूं नये किंवा गाड्यांतून ओढावें लागूं नये म्हणून अशी व्यवस्था करण्यांत येते. ही व्यवस्था नीट झाल्यावर स्कॉट्ची तुकडी निघाली.

१९१२ च्या जानेवारीच्या सुमारास ही तुकडी सुमारें ८७½ रेखांशा-पर्यंत पोहोंचली आणि तेथून कांहीं मंडळी परत फिरली. येथून पुढें स्कॉट्ची स्वतःची तुकडी एकटीच पुढें निघाली. दक्षिणध्रुव येथून केवळ १५० मैल उरलेला होता. पण आतां या तुकडींतील सर्व लोक अगदीं दमून गेले होते. तयार करून ठेवलेलीं मकाणें आतां मागें राहिलीं होतीं; आणि शेवटचें पठार तुडवण्याचें काम आतां चालू होतें. समुद्रसपाटीपासून हें पठार १०००० फूट उंचावर असून तुकडींतील लोकांना सामानाची जडशीळ ओझीं ओढीत पुढें जावें लागत होतें. जानेवारी १३ ला असें दिसून आलें कीं, आतां ६० मैलच शिल्लक राहिलेले आहेत. दुसऱ्या

दिवशीं ते आणखी २० मैल पुढें गेले. तोंच त्यांना असा एक फटका बसला कीं, त्यांच्या सर्व आशा एकाएकीं जमिनदोस्त झाल्या. स्कॉट्सकट सगळे लोक निराशेनें खचून गेले. अगोदरच एक एक पाऊल पुढें टाकायचें म्हणजे त्यांना जिवापाड मेहनत होत होती; आणि त्यांतच हा फटका बसल्यामुळें त्यांचें हातपाय अगदीं गळाले. फटका हा कीं, ८८ रेखांश ओलांडल्यानंतर, अमुंडसेन आधीं गेलेल्या वाटेवरच्या कांहीं कांहीं खुणा स्कॉटला दिसूं लागल्या. या खुणांचा त्याला फार उपयोग झाला. पण त्या पाहूनच त्याला उद्विग्नता येऊं लागली. त्यानें हेरलें कीं, अमुंडसेन आपल्या आधीं ध्रुवाला जाऊन पोहोंचला असावा. ही त्याची भीति खरी ठरली. १७ तारखेला तो ध्रुवबिंदूकडे पाहतों तों एक निशाण फडकतांना त्यांना दिसलें. अमुंडसेननें उभारलेलें नॉर्वेचें तें निशाण होतें. अर्थात्च स्कॉट आणि त्याचे साहसी मित्र या सर्वांची पराकाष्ठेची निराशा झाली. १८ तारखेला त्यांनीं डोलाअिट यंत्राचा उपयोग करून पाहिलें, तेव्हां अमुंडसेन यानें रोंवलेल्या निशाणाच्या पुढें अर्ध्या मैलावर खरा ध्रुवबिंदू आहे असें त्यांना दिसून आलें. आतां तेथपर्यंत जाऊन येण्यांत कांहींच स्वारस्य नव्हतें. पण ध्रुवावर आपण खरोखरीं जाऊन आलों हें मानसिक समाधान हवें होतें म्हणून ही मंडळी तेथपर्यंत जाऊन आली; आणि १९ तारखेला ते परत उत्तरेकडे चालूं लागले.

परतीच्या वाटेवर इव्हॅन्स हा पुन्हां पुन्हां खालीं बसूं लागला. त्याला पूर्ण विश्रांति मिळावी म्हणून स्कॉटनें एक दिवस मुक्कामच केला. आणि, भूगर्भांतील कांहीं जीर्ण अवशेषांचें उत्खनन त्यानें केलें. या नवीन वस्तू त्यानें बरोबर घेतल्या. त्यामुळें बरोबरच्या बोज्यांत आणखी अठरा शेरांची भरच पडली. पण केवळ शास्त्राभ्यासाला अवश्य म्हणून, त्यांनीं या वस्तू बरोबर घेतल्या. पुन्हां चालूं लागल्यावर इव्हॅन्स हा एकाएकीं उताणा पडला.

आणि त्याचें डोकें मागल्या अंगाला सडकलें. एकमेकांना सहाय्य करीत ते पुन्हां पुढें चालूं लागले, पण पायांतलें निसटलें म्हणून तो पुन्हां एकदां खालीं बसला ! तो अजून कां येत नाहीं हें पाहण्यासाठीं स्कॉट परत वळला. पाहतात तों, इव्हॅन्स सताड पसरलेला दिसला. त्याच रात्रीं इव्हॅन्स मरण पावला. तेथेंच त्याचा दफनविधी आवरून उरलेली मंडळी पुढें चालूं लागली.

तोंडावरून गार वारा सपाट्यानें वाहूं लागला; आणि दिवसाच्या कांठीं तीनचार मैलसुद्धां चालून होईनात. १७ मार्चपर्यंत इव्हॅन्स मेल्यापासून एक महिना लोटला होता. पण येवढ्या प्रदीर्घ काळांत झालेला प्रवास पाहून त्यांना नाऊमेद वाटूं लागली. ओट्स् नांवाचा त्यांचा दुसरा सोबती गळाटूं लागला. कारण त्याचे दोन्ही पाय बर्फानें फुटून रक्ताळून गेले. तो मोठा धिमा माणूस होता. तो मधून मधून विल्सनला म्हणत असे,"आतां कसे काय करावयाचें ?" विल्सन म्हणे कीं, "दुसरें कांहीं नाहीं. असेंच चालायचें ! " ओट्स् याला दिसूं लागलें कीं, आपण एक एक पाऊल टाकीत चालतों, यामुळें आपल्या मित्रांचा वेग कमी होत आहे, आणि अन्नाच्या करून ठेवलेल्या मकाणापर्यंत कुणा-लाच पोहोंचता येत नाहीं. मित्र म्हणाले, "जगलों तर सगळे जगूं. मेलों तर सगळे मरून जाऊं." मार्चच्या १७ तारखेला ओट्स् रात्रभर निजला. निजतांना त्याला वाटलें होतें कीं, आपण आतां झोपेंतच मरून जाऊं. पण सकाळीं तो जागा झाला. बर्फाचें वादळ जोरानें वहात होतें. तेव्हां तो आपल्या मित्रांना म्हणाला, " मी थोडा बाजूला जाऊन येतों. परत यायला मला थोडा वेळ लागेल." ओट्स् जो एकदां गेला, तो पुन्हां कधीं परत आलाच नाहीं. त्यांनीं इकडे तिकडे पुष्कळ पाहिलें, पण तो कोठें दिसेना. त्यांनीं ताडलें कीं, आपल्याला अधिक वेगानें जातां यावें

म्हणून या मित्रानें दूर जाऊन जीव दिला असला पाहिजे. हेंच खरें होतें. त्यांनीं एक कसला तरी क्रॉस केला आणि तो बर्फांत खोंचून ठेवला. त्यावर लिहिलें होतें कीं, ' याच जागेच्या आसपास एक शूर आणि उमदा माणूस मरण पावला आहे. '

येथून पुढें अन्नाचें मकाण ३१ मैलांवर होतें. रोज पांच मैलांपेक्षां वाटचाल जास्त होईना. मकाणाच्या पलीकडे ११ मैल असतांनाच एक बर्फांचें भयंकर वादळ सुरूं झालें आणि जागचें हलतांसुद्धां येईना. अन्न ऊन करून खाण्यास एक दिवसाचें सर्पण उरलें होतें आणि अन्न दोनच दिवसांचें होतें. पण या ठिकाणीं, त्या बर्फाच्या वादळांत, त्यांचा मुक्काम चार दिवस पडला. आतां त्यांतून बाहेर पडणें सर्वथा अशक्य होतें. अन्नावांचून प्राण कासावीस होऊं लागले होते. स्कॉटचे उरलेले दोघे मित्र भुकेनें व्याकूळ होऊन मरणाच्या दारांत जाऊन बसले आणि स्कॉटनें स्वतः आपल्या डायरीचें शेवटचें पान भरलें.

आपल्याला अपयश कशानें आलें, याचा मनानें त्यानें शोध केला; आणि त्याची नोंद डायरींत केली. नोंदीच्या शेवटीं तो म्हणतो. " चार दिवस झाले. तंबूतून बाहेर पडतां येत नाहीं. कारण प्रचंड झंझावात भोंवतालीं घोंघावत आहे. आम्हीं आतां अगदीं क्षीण झालों आहों. नीट लिहितांही येत नाहीं. माझ्यापुरतें म्हणाल, तर या प्रवासाला मी लागलों, याचें मला बिलकूल वाईट वाटत नाहीं. या प्रवासांत एवढेंच सिद्ध झालें कीं, इंग्रज माणसें कसल्याही आपत्ति आणि कसलेही हाल सहन करतात; अशा प्रसंगीं एकमेकांना मदत करतात; आणि मोठ्या धैर्यानें मरून जातात. आजपर्यंत असे कितीतरी इंग्रज लोक मरून गेले आहेत. आम्हीं बोलून चालून अशा साहसालाच प्रवृत्त झालों होतों.

परिस्थिती आम्हांला प्रतिकूल बनली. आमची कोणाही विरुद्ध कसलीही तक्रार नाहीं. आम्हीं परमेश्वराच्या इच्छेला शरण जात आहों. शेवटपर्यंत जें काय होईल, तें करीत राहूं. आम्हीं जर जिवंत राहिलों असतों, तर माझ्या मित्रांनीं केवढें धैर्य दाखवलें, केवढा कंटकपणा, केवढा सोशिकपणा दाखवला, हें मी वर्णन करून सांगितलें असतें आणि तें ऐकून प्रत्येक इंग्रज माणसाचें मन थरारून गेलें असतें. मी हें केलेलें कच्चें टांचण आणि आमचीं मृत कलेवरें हींच आमचा इतिहास कथन करतील."

हे शब्द लिहिल्यावर बहुधा दुसऱ्याच दिवशीं स्कॉट, विल्सन आणि बॉवरस् हे तिघेही मरण पावले. त्यांच्या शोधासाठीं ऑक्टोबरच्या शेवटीं निघालेल्या लोकांना नोव्हेंबरच्या १२ तारखेला या शूर संशोधकांचीं प्रेतें सांपडलीं. तिघांचीं शरीरें आणि बाकीच्या वस्तू जशाच्या तशा होत्या. स्कॉटची डायरीसुद्धां अगदीं होती तशी राहिली होती. या तिघांचा दफनविधि त्यांनीं तेथेंच उरकला आणि एक क्रॉस उभा करून त्याच्यावर त्यांचीं वर्णनें लिहिलीं. ओट्स्चें प्रेत कोठें सांपडतें कां म्हणून आजूबाजूला त्यांनीं पुष्कळ पाहिलें. पण तें कोठें सांपडलें नाहीं. अशा रीतीनें स्कॉट्च्या पुढारीपणानें निघालेल्या या संशोधन-भ्रमन्तीचा करुणास्पद अंत झाला.

---

